# नवभारत

नोव्हेंबर - २०१५



नामदार गोखले

विजय तेंडुलकर





वाल्मिकी







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६९। अंक २। नोव्हेंबर २०१५
कार्तिक/मार्गशीर्ष शके १९३७
वार्षिक वर्गणी ४०० रूपये
या अंकाची किंमत रु. ४०/-

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक व प्राज्ञपाठशाळा मंडळ सहमत असतीलच, असे नाही.

## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.

प्राज्ञपाठशाळामंडळ
अध्यक्ष व विश्वस्त :
सरोजा भाटे

संपादक :
श्री. मा. भावे

संपादक मंडळ :
अशोक कृष्णाजी जोशी,
यशवंत कळमकर

संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले असले तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच, असे नाही.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नवभारत

## नोव्हेंबर २०१५

## अनुक्रमणिका



अनुक्रमणिका



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नेक - नामदार गोखल्यांचा 'भारत सेवक समाज!'

श्री. मा. भावे

१२ जून १९०५. जून महिना असल्यामुळे सूर्योदयाची वेळ सकाळी ६ च्या थोडी आधीच होती. फर्ग्युसन महाविद्यालयाच्या मागील टेकडीच्या टोकावर चार गृहस्थ समोरासमोर बसले होते. चौघेही इतक्या पहाटे स्नाने उरकून आणि न्याहारी न करताच लांब अंतरावरील आपापल्या घरातून चालतच टेकडीवर आले होते. चौघांच्याही चेह-यावर काहीएक महत्त्वाचा निर्णय घेतल्याची व तो निर्णय पाळण्याचा निर्धार केल्याची चमक दिसत होती. इतक्यात पूर्वेला सूर्यबिंब क्षितिजाच्या आडून उदयाला येत असल्याची प्रभा दिसू लागली.

त्या चौघांपैकी जो ज्येष्ठ दिसत होता, तो गृहस्थ उठून उभा राहिला व सूर्याकडे तोंड करून त्याने हात जोडले आणि गंभीर आवाजात शपथ घेतली की, "मी गोपाळ कृष्ण गोखले अंतःकरण पूर्वक शपथ घेतो की,"

१) माझा देश माझ्या चिंतनाच्या केन्द्रस्थानी राहील आणि त्याच्या सेवेसाठी माझ्यातील उत्कृष्ट क्षमता मी अर्पण करीन.

२) देशाची सेवा करताना मी स्वार्थ साधण्याची इच्छा बाळगणार नाही.

३) सर्व हिंदवासीय हे माझे बांधव आहेत; आणि धर्म व जात यांचा भेदभाव न मानता मी सर्वांच्या उन्नतीसाठी झटेन.

४) आमचा 'समाज'माझ्या व माझ्या कुटुंबीयांच्या उदरनिर्वाहाची जी सोय आपल्या कुवतीप्रमाणे करील, त्यावर मी संतुष्ट राहीन. स्वतःला पैसे मिळविण्यासाठी मी माझ्या सामर्थ्याचा व्यय करणार नाही.

५) मी माझे शील पवित्र ठेवेन.

६) कोणाशीही माझा व्यक्तिगत तंटा असणार नाही.

७) 'समाजा'ची ध्येये मी सतत लक्षात ठेवीन आणि 'समाजा'च्या हितसंबंधांचे संरक्षण करण्यासाठी मी दक्ष राहीन. 'समाजा'चे कार्य सिद्धीस जावे यासाठी शक्य ते प्रयत्न मी करेन. 'समाजा'च्या ध्येयांशी विसंगत असे वर्तन मी करणार नाही."

आपल्याशीच बोलत आहोत इतक्या हलक्या आवाजात गोखल्यांनी ही शपथ घेतली. त्यानंतर त्यांनी हीच शपथ अनेक वर्षे आपले सहकारी म्हणून काम करीत असलेल्या नटेश आप्पाजी द्रविड, गोपाळ कृष्ण देवधर आणि अनंत विष्णू पटवर्धन यांच्याकडून घेवविली. हा सर्व समारंभ इतक्या गांभीर्याने आणि एकाग्रतेने पार पडला की, त्यानंतर आणखी काही बोलण्याची इच्छाच राहिली नाही. एका फार मोठ्या ध्येयवादाचे आपण वारकरी झालो आहोत, याची जबाबदारीच प्रत्येकाला मूक बनवत होती.

(१)

नेक-नामदार गोपाळ कृष्ण गोखले त्या वेळी व्हाइसरॉयच्या परिषदेचे सभासद होते. देशातील सर्वोच्च अधिकारमंडळात ते होते आणि वरच्या दर्जाच्या ब्रिटिश अधिका-यांशी त्यांचा नित्याचा संबंध होता. त्या अधिका-यांची आपापल्या खात्यावरची पकड, त्यांचे प्रशासनकौशल्य, त्यांचे विस्तृत वाचन आणि योग्य वेळी चपखल 'अवतरणे' देण्याची त्यांची हातोटी, त्यांचे विस्तृत आणि लांब पल्ल्याचे धोरण आणि त्याच वेळी तपशिलांना नजरेआड न होऊ देण्याची त्यांची दक्षता या सा-याची मोठी छाप गोखल्यांवर पडली होती. अशा दक्ष व उच्चशिक्षित अधिका-यांच्या पथकासमोर आपला युक्तिवाद कसून मांडण्यासाठी किती परिपूर्ण तयारी करावी लागते, सरकारी अहवालांची केवढी उलथा-पालथ होते, सरकारने प्रसिद्ध केलेल्या आकड्यांतून लपलेली रयतविरोधी धोरणे उघडी करण्यासाठी किती सूक्ष्म अभ्यास लागतो आणि आपल्या प्रतिपादनात झालेली तसूभर चूकदेखील किती महाग पडते, याचा सततचा अनुभव गोखल्यांना येत होता.

या अधिकारीसमूहाचा मुकुटमणी होता लॉर्ड कर्झन. इंग्लंडमधील अतिप्राचीन आणि तालेवार घराण्याचा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

उच्चशिक्षित वारसदार! आपल्या अधिकाराचा रुबाब आणि आपल्या उच्चपदाचा दबदबा मिरविण्याची त्याला फार खुमखुमी होती. आपल्या टीकाकारांना तुच्छतेने घायाळ करण्यात तो वाकबगार होता. शेतीच्या दुःस्थितीबद्दल रोमेशचंद्र दत्त यांच्यासारख्या अधिकारी व्यक्तीने केलेल्या अभ्यासाचे कर्झनने कठोर भाषेत वाभाडे काढले होते. आंग्लशिक्षित हिंदी लोकांविषयी व त्यातही बडबड्या बंगाली बाबूंबद्दल कर्झनच्या मनात तीव्र तिरस्कार धुमसत असे. आपली लायकी नसताना हे शिक्षित हिंदी लोक प्रशासनात सहभागी होण्याचा आग्रह धरतात, याची त्याला चीड येई. खरा हिंदुस्थान हा कोट्यवधी शेतकरी, शेतमजूर, कारू-नारू आणि श्रमजीवी लोकांकडून घडतो आहे; ब्रिटिश राजवट आणि संस्थानिक हे या लोकांवर परंपरेने राज्य करत आले आहेत; रयतेचे हितसंबंध या राज्यकर्त्यांनाच कळतात व सांभाळता येतात; मूठभर शिक्षित बाबूंनी आपणच प्रजेचे प्रतिनिधी आहोत असा आव आणणे हास्यास्पद आहे, असे कर्झनला वाटे. ब्रिटिशांनी येथील राज्य हाती घेतले हा ईश्वरी संकेत आहे. कोट्यवधी प्रजेच्या कल्याणासाठी आम्ही राज्य करतो आहोत. आमच्या राजवटीचा असलेला नैतिक पाया फारच थोड्या राज्ययंत्रणांना लाभला असेल; आणि आम्ही ज्या कर्तव्यभावनेने प्रेरित होऊन कारभार करतो, तितकी प्रामाणिक कर्तव्यनिष्ठा क्वचित आढळून येईल.[१] कर्झनचा हा आत्मविश्वास होता आणि कर्झन तो वारंवार बोलून दाखवीत असे.

अशा लॉर्ड कर्झनला आणि त्याच्या कार्यतत्पर चमूला तोंड द्यायचे, ही सोपी गोष्टी नव्हती. त्यामुळे व्हाइसरॉयच्या परिषदेत द्यावयाच्या प्रत्येक व्याख्यानासाठी नामदार गोखल्यांना अपार कष्ट घ्यावे लागत. प्रत्येक शब्द व प्रत्येक वाक्य, गौरीच्या सजावटीत ज्याप्रमाणे प्रत्येक प्रदर्शनीय वस्तू घासूनपुसून व झटकून मांडलेली असते त्याप्रमाणे तपासून आणि शोभनीय करून व्याख्यानात बसवावे लागे. श्रीनिवास शास्त्री यांनी (नंतरच्या काळातील) एक आठवण सांगितली आहे की, एकदा भाषण तयार करताना गोखल्यांना एका अवतरणाची (कोटेशन) आठवण झाली. ते अवतरण कोणाचे व कोणत्या ग्रंथातील आहे, याचा शोध शास्त्री व त्यांचे सहकारी यांनी रात्रभर घेतला! हाती अवतरण लागेपर्यंत गोखले अस्वस्थ होते. गोखल्यांनी व्हॉइसरॉयच्या परिषदेच्या प्रत्येक अधिवशेनासाठी जी कसून तयारी केलेली असे, त्याची फळेही त्यांच्या अनुभवाला येत होती. गेली चार वर्षे त्यांनी अर्थसंकल्पावर केलेली भाषणे नावाजली गेली होती. खुद्द व्हॉइसरॉय लॉर्ड कर्झनने 'बडबड्या बंगाली बाबूंपेक्षा गोखले फार सरस आहेत', असा अभिप्राय खाजगी पत्रात नोंदवला होता.

(२)

गोखल्यांनी जवळजवळ १२ वर्षे रावबहाद्दुर रानड्यांकडे उमेदवारी केली होती. १८९० साली रावबहाद्दुरांनी गोखल्यांकडे पुण्याच्या सार्वजनिक सभेच्या चिटणिसाचे काम सोपवले होते. ज्या डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये आणि फर्ग्युसन महाविद्यालयात गोखले त्यांच्या आवडीचे अध्यापनाचे काम करीत होते, त्या सोसायटीत गोखल्यांनी चिटणिशी स्वीकारण्याच्या प्रश्नावरून फार मोठे काहूर उठले होते. गोखले सोसायटीशी एकनिष्ठ नाहीत, असा आरोप टिळकांनी केला होता. त्यानंतर सोसायटीच्या आजीव सभासदांच्या लागोपाठ सभा झाल्या होत्या. प्रचंड वादावादी झाली होती. टिळकांनी त्राग्याने राजीनामा दिला व दुःखाच्या आणि रागाच्या आवेशात लिहिलेल्या राजीनाम्याच्या पत्रात सोसायटी आपल्या मूळ उद्देशापासून दूर जात चालल्याचा आरोप केला होता.

गोखल्यांना मात्र रानड्यांच्या मार्गदर्शनाखाली सार्वजनिक सभेचे काम करायला मिळणे हा अलभ्य लाभ वाटत होता. रानड्यांची साक्षेपी नजर, सरकारकडून प्रसिद्ध होणा-या सांख्यिकी माहितीचा सुयोग्य उपयोग करून आपला मुद्दा सजविण्याचे कौशल्य, इंग्रजी भाषेवरील असाधारण प्रभुत्व, राष्ट्रीय जीवनाची नव्याने उघडली जाणारी क्षेत्रे जाणून घेण्याची उत्कंठा, त्या क्षेत्रातील व्यवहाराची मूलतत्त्वे समजावून घेऊन तो तो विषय सुलभतेने व तरीही परिपूर्णतेने लोकांसमोर मांडण्याची हातोटी या सगळ्याचा रोजचा अनुभव गोखल्यांनी घेतला होता. हे सर्व करताना रानडे केवढे परिश्रम घेत असत, त्यांचे वाचन केवढे विस्तृत व सर्वांगीण होते हे पाहून गोखले विस्मित होत व एवढा उरक आपल्या ठिकाणी




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कसा येईल याचा विचार करीत. बरं, हे सर्व वैचारिक उद्योग करताना रानड्यांनी स्वतःला लोकांपासून लांब ठेवले नव्हते. आधुनिक स्वरूपाचे सार्वजनिक जीवन १८७० सालापासून पुण्यात उभे राहू लागले होते. पुण्यात व महाराष्ट्रातीलही पुराणमतवादी समाजाला ही अपूर्वाईची गोष्ट होती. या नवीन रोपट्याची निगराणी करण्याची जरुरी होती. हे काम रानडे फार जिव्हाळ्याने व जीव ओतून करत होते. गोखल्यांच्या डोळ्यांसमोर एक नवा कालखंड आपल्या विविध अंगांची झळाळी प्रकट करीत आकार घेत होता. गोखल्यांना असे जाणवत होते की, या उद्योगात शे-शंभर होतकरू तरुणांनी मनापासून व आपले सर्वस्व पणाला लावून सामील झाले पाहिजे; आणि रानडे, ग. व्यं. जोशी[२], प्राचार्य सेबी अशा मुनिवर्यांची शागिर्दी करून त्यांच्याकडून सार्वजनिक कार्याची दीक्षा घेतली पाहिजे.

तथापि, १८९० सालापासून गोखल्यांना असा अनुभव येत होता की, ज्या जबाबदार व संयमी आणि अभ्यासावर अधिष्ठित अशा सार्वजनिक कार्याची घडण रानड्यांना व त्यांच्या सहका-यांना अपेक्षित होती, तिला उधळून लावणारी बेजबाबदार, अपरिपक्व आणि अनभ्यस्त अशी तरुण मंडळी सार्वजनिक जीवनात वाढत्या संस्थेने भाग घेऊ लागली होती. राजकीय विषयांवर ही अर्ध्या हळकुंडाने पिवळी झालेली तरुण माणसे जी बेताल व हिंसेपर्यंत पोचणारी भाषा वापरीत, तिचा गोखल्यांना उद्वेग येई.[३] त्यांना वाटे की, साधे वाण्याचे दुकान चालवायचे झाले तरी त्यासाठी वर्ष-दोन वर्षे उमेदवारी करावी लागते; आणि राजकारणात मात्र आपण जन्मसिद्ध शहाणपण घेऊन आलो आहोत अशा आविर्भावात तुम्ही तोंडाला येईल ते बोलता, याला काय म्हणावे? 'strength and restraint' आणि 'responsible criticism' हे गोखल्यांचे आवडते शब्दप्रयोग होते. आपण मांडत असलेल्या मुद्द्याला पुराव्याचे भक्कम पाठबळ हवे आणि आपण संयमी भाषेत तो मुद्दा आग्रहाने लावून धरावा; आपण जी टीका करू ती जबाबदारीने करावी, नव्या युगातील सार्वजनिक वादविवादाची ही पायाभूत रीत होती.

गोखल्यांना याची खंत होती की, ज्या टिळकांचा आदर्श ठेवून ते डेक्कन एज्युकेशन सोसायटीत आले होते, ते टिळकच या नवथर आणि हुल्लडबाज तरुणांना हाताशी धरून प्रोत्साहन देत होते. 'संमतिवयाचा कायदा' व त्यानंतर 'हिंदु मुसलमानांतील दंगे' या दोन्ही विषयांवर टिळकांनी घेतलेल्या भूमिका डॉ.भांडारकर व रा. ब. रानडे यांच्या विचारांना विरोध करणा-या होत्या, याचे गोखल्यांना दुःख नव्हते. पण शाळा-महाविद्यालयांतील धटिंगण पोरासोरांना या वादात उतरवून रानड्यांच्या पोक्त व विचारी नेतृत्वाचा त्यांनी जो मानभंग चालवला होता, त्याची वेदना असह्य होती. गोखले सार्वजनिक सभेचे चिटणीस झाल्यावर पाच वर्षांनी (१८९५ साली) टिळकांनी आपल्या अनुयायांचे बहुमत सार्वजनिक सभेत घडवून आणले व आपल्या पसंतीच्या व्यक्तींची कार्यकारिणी निवडून आणली. मात्र चिटणीसपदावर त्यांनी गोखल्यांनाच ठेवले! ही व्यवस्था रानड्यांच्या अनुयायांना पसंत पडणारी नव्हती. त्यांनी स्वतःची 'डेक्कन सभा' स्थापन केली. गोखल्यांनी चिटणीसपदाचा राजीनामा दिला व ते 'डेक्कन सभे'चे चिटणीस झाले. टिळकांच्या अनुयायांची झुंडशाही रानडे-गोखले यांना अभिप्रेत असणा-या सुसंस्कृत आणि संयमशील सार्वजनिक व्यवहाराला धरून नव्हती, हे स्पष्टच होते.

(३)

सार्वजनिक जीवनात गटबाजी टोकाला पोचली तर असहिष्णुता व सहानुभूतीशून्यता मर्यादेच्या बाहेर जाते व प्रामाणिक कार्यकर्त्याला आपले काम चालवणे मुश्किल होते, याचा दारुण अनुभव गोखल्यांना १८९७ साली आला. या वर्षी ब्रिटिश पार्लमेंटने हिंदुस्थानाच्या आर्थिक स्थितीचा आढावा घेण्यासाठी एक आयोग नेमला होता व लॉर्ड वेल्बी त्या आयोगाचे अध्यक्ष होते. त्या आयोगासमोर लोकांची बाजू मांडण्यासाठी दिनशा वाच्छा, सुरेंद्रनाथ बॅनर्जी आणि गोखले असे तिघे गेले होते. गोखल्यांनी आपले म्हणणे या आयोगासमोर साधारपणे व कसोशीने मांडले आणि त्यांच्या या कैफियतीची मोठी वाहवा इंग्लंडमध्ये झाली. काँग्रेसचे एक संस्थापक वेडरबर्न आणि दादाभाई नौरोजी हे दोघेही ब्रिटिश लोकसभेचे सभासद होते. त्यांनी गोखल्यांच्या प्रभावी युक्तिवादाचे फार कौतुक केले. अशा रीतीने आपल्या कर्तृत्वाच्या









राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शिखरावर असताना गोखल्यांकडून अनवधानाने म्हणा किंवा फाजील विश्वासामुळे म्हणा, एक चूक झाली.

त्या काळात पुण्याला प्लेगची साथ भयंकर थैमान घालीत होती. पण ही साथ पुरविली व त्या साथीला आळा घालण्याचे सरकारी उपाय नकोत, असा अनर्थ रँड नावाच्या अधिका-याच्या नेतृत्वाखालील प्लेग (प्रतिबंधक) समितीने मांडला होता. या कमिटीच्या उन्मत्त कारभारावर गोखल्यांचे फर्ग्युसन महाविद्यालयातील सहकारी प्रा. वा. ब. पटवर्धन व प्रा. भानू हे 'सुधारक' या वृत्तपत्रातून कडक टीका करीत होतेच; पण त्यांच्या नेमस्त पक्षातील मंडळीही संतप्त झाली होती. अशा धामधुमीच्या काळात २२ जून १८९७ रोजी रँडचा खून झाला. या खुनामुळे इंग्लंडमध्ये मोठा गहजब माजला. साहजिकच इंग्लंडमधील वृत्तपत्रे हिंदुस्थानातून वेल्बी आयोगासमोर बाजू मांडायला गेलेल्या प्रतिनिधींना या विषयी प्रश्न विचारू लागली. 'मँचेस्टर गार्डियन' हे इंग्लंडमधील नावाजलेले उदारमतवादी वर्तमानपत्र होते. त्याला गोखल्यांनी सांगितले की, 'प्लेग कमिटीने पुण्यात अतिशय जुलूम केला, म्हणूनच हे खून झाले असावेत... सोजिर व प्लेगचे अधिकारी बायकांना रस्त्यावर आणून तपाशीत. एक-दोन बायकांवर जुलूम होऊन एकीने जीवही दिला !' [४]

या मुलाखतीनंतर इंग्लंडमध्ये खळबळ माजली. इंग्लंडच्या संसदेत अनेकांनी प्रश्न विचारले. भावनगरी नावाचे पार्शी गृहस्थ ब्रिटिश लोकसभेचे सभासद होते. त्यांनी गोखल्यांवर जहाल टीका केली. अखेर मुंबई सरकारच्या अहवालांवरून इंग्लंडच्या सरकारने जाहीर केले की, गोखल्यांनी केलेले सर्व आरोप खोटे आहेत! गोखल्यांच्या मुलाखतीनंतर पुण्याच्या कलेक्टर लँब याने गोखल्यांच्या स्नेह्यांना व प्रतिष्ठित गृहस्थांना पत्रे पाठवून विचारले होते की, 'गोखल्यांनी सांगितलेल्या बातम्या ख-या की खोट्या?'

पण ज्यांनी गोखल्यांना पुण्याहून या अत्याचाराची माहिती कळविली होती, त्यांपैकी एकाही माहीतगाराने लँबला इतकेही सांगितले नाही की, 'आम्ही असे ऐकले होते.' अशा रीतीने गोखले व त्यांचे इंग्लंडमधील पाठीराखे दादाभाई नौरोजी आणि वेडरबर्न तोंडघशी पडले.

त्यानंतर गोखले हिंदुस्थानात परतले. त्यांचे जहाज मुंबई बंदराला लागले असताना मुंबईचे पोलिस आयुक्त यांनी गोखल्यांची जहाजावरच भेट घेतली. आपण विलायतेत केलेल्या 'निराधार' विधानांबद्दल गोखल्यांनी लगेचच सविस्तर व विनाहरकत माफी मागितली व तसे पत्र मुंबई सरकारला लिहून दिले. या वेळी गोखले चांगलेच कात्रीत सापडले होते. त्यांनी माफी मागितली नसती, तर संपूर्ण नोकरशाहीने त्यांच्यावर दात धरला असता. माफी मागितल्याने आपण लोकांच्या निंदेचे लक्ष्य होणार, हेही त्यांना कळत होते. अशा विलक्षण पेचात अडकले असल्याने आता आपल्या सदसद्विवेकाच्या टोचणीमुळे आणि राजकीय शिष्टाचाराची बूज ठेवत त्यांनी माफी मागितली, हे योग्यच केले.

परंतु त्यानंतर दोन वर्षेतरी गोखल्यांना लोकांचा राग सहन करावा लागला. १८९७ च्या डिसेंबरात उमरावतीला (आताची अमरावती) काँग्रेसचे अधिवेशन भरले.पण तेथे भाषण करण्यास गोखले धजावले नाहीत. उमरावतीतून पुण्याला आल्यावर गोखल्यांनी माफीचा खुलासा प्रसिद्ध केला. त्यात म्हटले होते की, (मी माफी मागितली नसती तरी) कायद्याच्या दृष्टीने मला बिलकूल धोका नव्हता; पण मन खाऊ लागले [५] बरे, दिलखुलास माफी मागूनही मुंबई प्रांताचे तेव्हाचे गव्हर्नर लॉर्ड सॅण्ढर्स्ट यांनी गोखल्यांवर (गोखल्यांचे नाव न घेता) कठोर टीका केलीच. पुण्यातील लोक तर गोखल्यांची टिळकांशी तुलना करून गोखल्यांची अवहेलना करीत. टिळक त्या वेळी राजद्रोहाच्या खटल्यात अपराधी ठरून तुरुंगात गेले होते. या सर्व हेटाळणीचा उद्वेग वाटून गोखल्यांनी पुणे सोडून मुंबईला कायमचे राहायला जावे, असाही विचार केला होता.[६]

इतके असले तरी गोखल्यांनी धीर सोडला नव्हता. ५ फेब्रुवारी १८९८ रोजी आपल्या रोजनिशीत त्यांनी येत्या काही वर्षांत आपण कोणत्या गोष्टी करणार, याची महत्त्वाकांक्षी यादी लिहिली होती. 'श्री गरूदतात्रेयांचा आशीर्वाद असेल, तर मी नम्रपणे पण निश्चयाने खालील विषयांचा अभ्यास करीन–योग, इतिहास, तत्त्वज्ञान, खगोलशास्त्र, भूगर्भशास्त्र, शरीरशास्त्र आणि फ्रेंच भाषा.' राजकारणातील आपल्या प्राप्तव्यांविषयी त्यांनी म्हटले




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

होते,'मी मुंबईच्या गव्हर्नरच्या परिषदेचा सभासद होण्यासाठी प्रयत्न करीन; नंतर व्हॉइसरॉयच्या परिषदेवर जाईन; अखेर ब्रिटिश संसदेवर जाण्याची माझी इच्छा आहे. या सर्व सभागृहांत मी माझ्या देशाच्या भल्यासाठी शक्य ते प्रयत्न करेन."[७] खरोखरच गोखल्यांनी यांतील कित्येक गोष्टी साध्य केल्यादेखील. १८९९ साली ते मुंबईच्या गव्हर्नरच्या परिषदेवर निवडून गेले. १९०२ साली त्यांची व्हाइसरॉयच्या परिषदेवर नेमणूक झाली. व त्या परिषदेवर ते शेवटपर्यंत होते. ब्रिटिश लोकसभेवरही ते पोचले असते; पण त्यांना तेवढे आयुष्य लाभले नाही.

(४)

इंग्रजांचे राज्य १९ व्या शतकाच्या सुरुवातीला हिंदुस्थानात स्थिर झाल्यानंतर इंग्रजांनी देशात सरकारी नियंत्रणाखालील शिक्षणपद्धती सुरू केली. १८५४ नंतर सरकारने असा निर्णय घेतला की, देशातील लोकांना इंग्रजीतून पाश्चात्त्य विद्यांचे शिक्षण दिले जाईल. हे सर्व करताना असा प्रचार केला जाई की, हिंदुस्थातील समाज हा जगाच्या इतिहासाच्या मुख्य प्रवाहापासून बेगळा पडून एखाद्या डबक्यासारखा बाजूला कुजत राहिला आहे. इंग्रजांची आणि हिंदी लोकांची ईश्वरानेच सांगड घालून दिली असून तिचा उद्देश असा आहे की, हिंदी लोक आधुनिक व्हावेत आणि तसे ते आधुनिक झाले की, आम्ही सत्तेची सूत्रे येथील लोकांकडे सोपवून निघून जाऊ.

ईश्वरी संकेताचा हा सिद्धान्त सुशिक्षितांच्या पहिल्या पिढ्यांनी पूर्णपणे स्वीकारला होता. रा. ब. रानडे आणि त्यांचे निष्ठावान शिष्य गोखले या दोघांनाही हा सिद्धान्त मान्य होता. त्यांना असे वाटे की, राष्ट्राचा कारभार आधुनिक रीतीने करण्याची क्षमता आपल्या अंगी आहे, असे येथील समाजाने आपल्या सार्वजनिक कार्यातून दाखवून दिल्यास इंग्रज येथील कर्त्या लोकांकडे राज्य सोपवून निघून जातील. यासाठी अर्थातच देशातील सार्वजनिक जीवन शिष्टाचार व संस्कृतिसंपन्न व्हावयास हवे. असे सार्वजनिक जीवन घडवायचे तर त्या काळात निदान १००-१२५ तरुण सुशिक्षित माणसांनी देशसेवेसाठी स्वतःला सर्मपित करून घ्यायला हवे होते.

गोखल्यांचे एक वाक्य प्रसिद्ध आहे की, 'Public life must be spiritualised.' याचा अर्थ असा की, देशाची सेवा ही इतक्या उत्कटतेने करण्याचा निश्चय असावा की, त्याच्यापुढे इतर सर्व गोष्टी किरकोळ व तुच्छ वाटल्या पाहिजेत. कार्यकर्त्याच्या ठिकाणी ही वृत्ती असेल, तर तो वैयक्तिक हेव्यादाव्यांत गुंतून पडणार नाही; तो आपल्या विरोधकांच्याही सद्वर्तनावर आणि सदिच्छांवर विश्वास ठेवील; एखाद्या विषयासंबंधी प्रामाणिक मतभेद झाल्यास त्यासंबंधात निर्माण होणा-या दोन पक्षांमध्येदेखील देशाच्या हितासाठी एकमेकांना समजावून घेण्याची इच्छा राहावी असा प्रयत्न तो करील. गोखल्यांनी इंग्लंडमध्ये परस्परविरोधी दोन पक्ष असतानाही त्या पक्षात सार्वजनिक प्रश्नावर कसे सामंजस्य होते, ते पाहिले होते.

देशभक्ती ही उत्कट असावी खरी; पण तशी उत्कटता बाळगतानाही तारतम्य सुटू देता कामा नये. याचा अर्थ असा की, दर स्थितीत आपण आपली नैतिक आणि भौतिक सामग्री लक्षात घेऊन आपल्याला राजकीय सुधारणा मिळवता येणे शक्य आहे, याचा अदमास घेतला पाहिजे. यामुळेच स्वराज्य आणि स्वातंत्र्य यांविषयी वावदुकी करणा-या राजकारण्यांची गोखल्यांना चीड येई. आपण आपले नैतिक आणि भौतिक सामर्थ्य वाढविले तरच इंग्रजांकडून राजकीय सुधारणा प्राप्त करून घेण्याची शक्यता वाढते. ही सामर्थ्ये वाढविण्यासाठी देशभक्तांनी दीर्घकाळ आपल्या ज्येष्ठांच्या देखरेखीखाली शागिर्दी केली पाहिजे. आपण पाहिले आहे, की स्वतः गोखल्यांनी रा. ब. रानडे यांच्या मार्गदर्शनाखाली खूप वर्षे अशी तपस्या केली होती. अशा देशभक्तांनी ख्रिस्ती मिशनरी किंवा सैनिक यांच्याप्रमाणे शिस्त आपल्या अंगी बाणवली पाहिजे. या शिस्तीचे मूळ तत्त्व असे आहे की, व्यक्तीने आपला विवेक आणि आपला निर्णय यांत अंतर ठेवले पाहिजे. आपला विवेक आपल्यापाशी, मात्र आपला निर्णय वरिष्ठ सांगतील त्याप्रमाणे.[८]

इंग्लंड हा देश–म्हणजे तेथील समाज–आणि त्या देशातील लोकशाही व्यवस्था या दोन्हींवर गोखल्यांचा मनापासून विश्वास होता. जोपर्यंत इंग्रजांचे राज्य इथे आहे, तोपर्यंत या देशातील देशभक्तांनी इंग्लंडमधील विरोधी पक्षाप्रमाणे आपले काम करीत राहिले पाहिजे.






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

इंग्लंडमधील लोकांनी नाना त-हेची आंदोलने करून तेथील राज्यकर्त्या वर्गाकडून राज्यकारभारातील अधिकाधिक हिस्सा सर्वसामान्य लोकांना मिळावा, असे कायदे करून घेतले होते. तेच उदाहरण आपल्याकडील देशभक्तांनी स्वतःपुढे ठेवले पाहिजे. शिवाय इंग्लंडबरोबरचे भारताचे संबंध पूर्णपणे तुटले पाहिजेत, अशी अतिरेकी मागणी त्यांना मान्य नव्हती. अशी मागणी धोक्याची असून त्यातून अनर्थ ओढवेल, असे ते म्हणत असत.[९] सनदी नोक-यांमध्येदेखील इंग्रज अधिकारी राहिले पाहिजेत, असे त्यांला वाटे.

इंग्रजांकडून राज्य मिळवावयाचे ते टप्प्याटप्प्याने आणि राजकीय सुधारणांचा विस्तार करीत. तसेच आपण इंग्रजांना हाकलून देऊन किंवा सत्तेची सूत्रे त्यांच्याकडून हिसकावून घेऊन स्वातंत्र्य मिळवायचे हेदेखील त्यांना मान्य नव्हते. सरकारी यंत्रणेला समांतर अशी यंत्रणा आपण उभी करायची आणि या प्रतिसरकाराने मूळ सरकारला खो द्यायचा, ही कल्पनाच गोखल्यांना अतिशय दुष्ट आणि देशाच्या राज्यव्यवस्थेला सुरुंग लावणारी आहे, असे वाटत असे. अशा त-हेची चळवळ केल्यास प्रस्थापित सरकारची प्रतिष्ठा पणाला लागते आणि तसे झाल्यास ते देशातील प्रजेवर अनिष्ट परिणाम करणारे ठरते, असे त्यांना निश्चितपणे वाटत होते.[१०] याचा अर्थ असा नव्हे की, हिंदी प्रजेला स्वतःचे हक्क आणि राज्ययंत्रणेतील वाटा मिळू नये, अशी गोखल्यांची इच्छा होती. कोणाही हिंदी व्यक्तींची प्रतिष्ठा कोणाही इंग्रज व्यक्तीच्या प्रतिष्ठेइतकी असली पाहिजे, असा त्यांचा आग्रह होता. मात्र ही प्रतिष्ठा इंग्रजांना हाकलून देऊन मिळवायची असे नसून येथील लोकांची पात्रता शिक्षण, देशभक्ती आणि उच्च दर्जाचे सार्वजनिक कार्य यांचा उपयोग करून इतकी वाढवायची की, येथील इंग्रजांना हिंदी लोकांची अवहेलना करण्याला अवसरच मिळू नये. हे जर घडवून आणायचे असेल, तर अशा निःस्वार्थ आणि देशभक्तीने प्रेरित तरुणांना एकत्र करून व सार्वजनिक जीवनातील शिष्टाचाराचे शिक्षण देऊन त्यांना समाजकार्यासाठी तयार करायचे, असे हेतू मनात बाळगून गोखल्यांनी 'भारत सेवक समाजा'ची स्थापना केली.

'भारत सेवक समाजा' ची उद्दिष्टे सहजपणे सांगता आली तरी प्रत्यक्षात तशी संस्था काढणे आणि तिचा विस्तार करणे अनेक दृष्टींनी अवघड होते. पहिले असे की, हे भारत सेवक व त्यांची कुटुंबे यांचा उदरनिर्वाह होईल इतका मासिक भत्ता त्यांना 'समाजा' कडून मिळायला हवा. यासाठी 'समाजा'पाशी पुरेशी पुंजी असली पाहिजे. खेरीज हे 'भारत सेवक' जी कामे हाती घेतील. त्या कामासाठीही पैसे लागणार होते. हे पैसे गोळा करण्याचे काम गोखल्यांनी हाती घेतले. गोखले स्वतः व्हाइस रॉयच्या परिषदेवर असल्यामुळे देशातील अनेक उच्चपदस्थ व श्रीमंत लोकांशी त्यांचा निकटचा संबंध होता. त्यामुळे पैसे गोळा करणे त्यांना फारसे अवघड गेले नसावे. मुंबईतील एक श्रीमंत उद्योगपती सर लल्लूभाई सामलदास व गोखले श्रीमंत व्यापा-यांकडे जाऊन निधी गोळा करीत.

'समाजां'च्या मुख्य ठिकाणी सभासदांना शिक्षण देण्याची व राहण्याची सोय करणे गरजेचे होते. त्यासाठी पुस्तके, शोधनियतकालिके, सरकारी अहवाल यांचा साठा असलेले ग्रंथालय तयार करायला हवे होते. ही कामे गोखल्यांनी हाती घेतली. गोखल्यांचे स्वतःचे घरही या वसतिगृहापासून जवळच अतिशय साधेपणाने बांधण्यात आले. 'भारत सेवक समाजा'चा विस्तार टप्प्याटप्प्याने होत गेला. मुंबई, नागपूर, अलाहाबाद, मद्रास येथे 'समाजा'च्या शाखा तयार झाल्या व सभासदांनी आपापली क्षेत्रे निवडून कामाला सुरुवात केली. याचा थोडक्यात आढावा आपण पुढे घेणारच आहोत.

(५)

'समाजा'ची घटना करण्याचे काम फार काळजीपूर्वक व्हावयास हवे होते. पहिले म्हणजे सरकारला या 'समाजा' च्या कार्याविषयी संशय वाटणार नाही किंवा ही एखादी क्रांतिकारी संस्था आहे असा वहीम येणार नाही, अशा पद्धतीने घटना करायला हवी होती. दुस-या बाजूला अशीही काळजी घेणे जरूर होते की, काँग्रेसमधील किंवा बाहेरील हिंदी राजकारण्यांना असे वाटायला नको की, ही नवी संस्था सरकारची हस्तक आहे. त्या काळात सार्वजनिक व समाजोपयोगी कार्य करणा-या संस्था नव्यानेच निर्माण होत होत्या. त्यामुळेच संस्थेची घटना, तिचे सभासद करण्याची रीत, संस्थेच्या कामाची नियमावली, संस्थेतील निर्णय घेणारी





राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कार्यकारिणी या सर्वच गोष्टी समाजाच्या अंगवळणी पडलेल्या नव्हत्या. त्या वेळी आजच्याप्रमाणे सरकारने धर्मादाय आयुक्त हा संस्थांवर नियंत्रण ठेवणारा अधिकारीही नियुक्त केला नव्हता. सारांश, या सर्व बाबी लक्षात घेऊन 'समाजा' ची घटना तयार करायला हवी होती.

गोखल्यांनी आपल्या 'समाजा'च्या घटनेचा तर्जुमा २-३ वेळा तयार केला व तो आपल्या मित्रांकडे तसेच सरकारी अधिका-यांकडे पाठविला आणि त्यांच्या सूचनांचा विचार करून शेवटचा तर्जुमा तयार केला. उदा., घटनेच्या ५ व्या कलमाच्या मूळ आवृत्तीत गोखल्यांनी म्हटले होते की, 'समाजा'चा प्रत्येक सभासद 'समाजा'च्या प्रथम सभासदाच्या आज्ञेखाली ५ वर्षे बिनातक्रार काम करील. या कलमाला गोखल्यांचे आदरणीय मित्र प्रा. सेलबी यांनी हरकत घेतली. ते म्हणाले की, 'कोणा मनुष्याने दुस-याचा ५ वर्षांसाठी गुलाम होऊन राहणे ही कल्पनाच मला करवत नाही. अशा त-हेची शर्त जेझुइट पंथाच्या लोकांवर लादलेली असते आणि त्यामुळेच प्रोटेस्टंट पंथाचे लोक जेझुइट पंथाचा निषेध करत असतात.' ही टीका स्वीकारून गोखल्यांनी आपल्या पुढच्या तर्जुम्यातील ५ व्या कलमात खालीलप्रमाणे सुधारणा केली – 'प्रत्येक उमेदवार सभासद आपल्या उमेदवारीच्या काळात 'पहिल्या सभासदांच्या' मार्गदर्शनाखाली आणि नियंत्रणाखाली राहील. तसेच पहिला सभासद जी कामे करावयास सांगेल, ती तो उमेदवार सभासद बिनातक्रार करील.' हे कलम नव्या तर्जुम्यात १० वे कलम म्हणून घालण्यात आले.

गोखल्यांनी आपल्या 'समाजा'ची घटना मुंबईचे तेव्हाचे गव्हर्नर लॉर्ड लॅमिंग्टन यांनाही दाखविली होती. हेतू असा होता की, एकदा सरकारी अधिका-यांनीच 'घटने' ला मंजुरी दिल्यानंतर 'समाजा'चे कार्य गुप्तहेर आणि पोलिस यांच्या टेहळणीपासून मुक्त राहील. परंतु तसे काही झाले नाही. सभासदांना गुप्तहेरांचा आणि पोलिसांचा जाच ब-याचदा सहन करावा लागला. एका व्हाइसरॉयने तर खुद्द गोखल्यांनाच विचारले होते की, "आमचे अधिकारी तुमच्या 'समाजा'विषयी शंका आणि संशय का बाळगतात?"[११]

२० व्या शतकाच्या सुरुवातीला आणि विशेषतः बंगालची फाळणी सरकारने जाहीर केल्यानंतर बंगालमध्ये व महाराष्ट्रात देशभक्तीचा कल्लोळ झाला. अनेक तरुण देशभक्तीच्या भावनेने पेटून उठले. स्वदेशी, बहिष्कार, स्वराज्य, आणि राष्ट्रीय शिक्षण या चार मार्गांनी सरकारला विरोध करायचा, असे वातावरण तयार झाले. बहुतेक तरुणांमध्ये आत्मसर्मपणाची भावना इतकी प्रबळ उत्पन्न झाली होती की, देशभक्ती हाच धर्म आहे, असे ते मानत होते. त्यामुळे देशभक्तीची अभिव्यक्ती पुष्कळ वेळा धर्माच्या परिभाषेतूनच होत असे. साहजिकच गोखल्यांनीही आपल्या संस्थेला काही प्रमाणात धर्माचे अवगुंठन घातले होते. तथापि, गोखल्यांनी हिंदू किंवा मुस्लिम या धर्मांची परिभाषा आपल्या संस्थेच्या कामासाठी न वापरता 'सोसायटी ऑफ जीझस' या संस्थेचे अनुकरण केले. श्रीनिवास शास्त्री यांनी म्हटले आहे की, गोखल्यांनी त्यांना संस्थेची शपथ दिली, तेव्हा गोखले एक कविता हलक्या आवाजात गुणगुणत होते. शास्त्री सांगतात की, ही गोष्ट कोणासही सांगू नये असे गोखल्यांनी शास्त्री यांना बजावले होते. असे दिसते की शपथ देताना गोखले, 'लीड काइंडली लाइट' ही कार्डिनल न्यूमनने लिहिलेली प्रार्थना म्हणत असत.[१२] कार्डिनल न्यूमन हा जेझुइट होता.

आपण पाहिलेच आहे की, संस्थेच्या सभासदांनी घेतलेल्या शपथेत असा भाग आहे की, तो सभासद संस्था त्याला जो मासिक भत्ता देईल, तेवढ्यावरच संसार चालवील. याचा अर्थ असा की, जर समजा एखाद्या सभासदाला तो 'भारत सेवक समाजा'चे काम करीत आहे त्यापासून काही कमाई झाली, तर त्या सभासदाने ते पैसे संस्थेकडे जमा करायचे. या अटीमुळे असे झाले की, कित्येक होतकरू व्यक्तींना संस्थेचे सभासद व्हावयाचे असूनही स्वतःला होणारी मिळकत व कौटुंबिक जबाबदा-या बाजूला सारून संस्थेचे सभासद होणे परवडण्यासारखे वाटले नाही. त्यामुळे संस्थेच्या सभासदांची संख्या कायमच मर्यादित राहिली. काही कर्तृत्ववान माणसे संस्थेची सभासद झाली देखील; पण नंतर त्यांनी सभासदत्व सोडले.

महात्मा गांधी दक्षिण आफ्रिकेतून परतल्यानंतर गोखल्यांच्या आज्ञेवरून एक वर्ष देशभर फिरत राहिले.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्यानंतर त्यांनी संस्थेच्या सभासदत्वासाठी अर्ज केला. त्या वेळी गोखले हयात नव्हते. तथापि गोखल्यांची इच्छा मात्र अशी होती की, गांधींना सभासद करून घ्यावे. आता श्रीनिवास शास्त्री संस्थेचे 'प्रथम सभासद' किंवा अध्यक्ष झाले होते. त्यांना असे वाटले की, गांधीजींचे राजकीय विचार आपल्या संस्थेच्या स्वभावाशी जुळणारे नाहीत. (पुढे जाऊन गांधीजींनी असहकाराची चळवळ केली. तिचा हेतु जनमानसातील सरकारची प्रतिष्ठा खच्ची करण्याचा होता. आपण पाहिले आहे की, खुद्द गोखल्यांना व त्याहीपेक्षा संस्थेतील त्यांच्या नेमस्त अनुयायांना ही चळवळ नक्कीच धोक्याची वाटली असती.) त्यामुळे संस्थेने गांधीना सभासद करून घेतले नाही, हे ठीकच झाले.

(६)

'भारत सेवक समाज' सुरू केला तेव्हा गोखले हे 'प्रथम सभासद' आणि द्रविड, देवधर आणि पटवर्धन असे तिघे उमेदवार सभासद अशी स्थिती होती. पाच वर्षांनंतर १९१० साली, १२ जूनला पुन्हा हे चौघे एकत्र आले. त्यापूर्वी १९०७ साली श्रीनिवास शास्त्री यांना गोखल्यांनी सभासदत्वाची शपथ दिली होती. पण ते आजारी असल्यामुळे सभेस आले नाहीत. या सभेत सुरुवातीला गोखल्यांनी सांगून टाकले की, द्रविड, देवधर आणि पटवर्धन यांची उमेदवारी पूर्ण झाली असून ते आता हक्कदार सभासद झाले आहेत. १९१० साली हे चार हक्कदार सभासद आणि इतर २० उमेदवार सभासद मिळून संस्थेचे २४ सभासद होते. आणखी एका व्यक्तीने सभासद होण्याची इच्छा व्यक्त केली होती. त्यामुळे गोखल्यांनी समाधानाने म्हटले की, "आता आपण सर्व मिळून २५ जण सभासद आहोत."

संस्थेच्या कामाचे दोन भाग होते. पहिला म्हणजे सभासदांना शिक्षण देण्याचा; आणि दुसरा प्रत्यक्ष कार्य करण्याचा. गोखल्यांनी सांगितले की, आपल्या संस्थेच्या दोन शाखा आपण सुरू करणार आहोत. एक मद्रासला व दुसरी मुंबईला. मद्रासच्या शाखेचे प्रमुख श्रीनिवास शास्त्री असतील आणि मुंबई शाखेचे प्रमुख गोपाळ कृष्ण देवधर असतील. पुण्याला संस्थेची मुख्य कचेरी असून तिथेच सभासदांच्या प्रशिक्षणाचा कार्यक्रम चालेल. या कचेरीचे प्रमुख नटेश आप्पाजी द्रविड असतील.

आपल्या देशातील सार्वजनिक जीवन पुरेशा वरच्या दर्जाचे नाही, याची तीन कारणे गोखल्यांनी सांगितली. पहिले असे की, सामाजिक कार्यकर्ते पुरेसे निःस्वार्थ नाहीत. आपण जे काम करायचे ते पूर्ण संन्यस्त वृत्तीने केले पाहिजे. जी माणसे स्वतःला धर्मकार्याला वाहून घेतात, ती अशा प्रकारचा सर्वस्वत्याग करू शकतात. तसा त्याग आपल्याकडून अपेक्षित नाही; परंतु त्या त्यागाचा आदर्श ठेवून काम केले पाहिजे. दुसरा भाग हा की, सार्वजनिक कार्यात पडणा-या माणसांनी अभ्यासवृत्ती ठेवली पाहिजे. प्रत्येक सार्वजनिक प्रश्नाची चहूबाजूंनी माहिती काढली पाहिजे. तिसरे हे की, आपल्या सभासदांची वृत्ती आज जगभर जो उदारमतवाद पसरत आहे, त्याच्याशी सुसंगत असावी. ही समधात अवस्था प्रश्नांची संपूर्ण माहिती घेतल्यामुळे येतेच; पण मुळातच उदारमतवादी मानसिकता असेल, तर अशी वृत्ती आपोआपच विकसित होत जाते.

याच व्याख्यानात गोखले असेही म्हणाले होते की, एका देशाने दुस-या देशावर राज्य करणे ही गोष्ट न्यायाची नव्हे; पण ब-याचदा परिस्थिती अशी असते की, परकीय राज्य उपयोगाचे आणि प्रगती व व्यवस्था यांना उपकारक असते. आज आपल्या समाजाची अवस्था बिकट आहे. आपल्यात अनेक प्रकारची फाटाफूट आहे. आपण अनेक अंगांनी मागासलेले आहोत. अशा वेळी ब्रिटिश राज्य इथे असणे गरजेचे आहे आणि ती राजवट आपण इमानदारीने स्वीकारली पाहिजे. आपल्या समाजात शांततेच्या मार्गाने मूलभूत बदल घडवून आणायचा असेल, तर ब्रिटिश राजवटीला आपण सक्रिय पाठिंबा दिला पाहिजे. ह्या राजवटीखाली आपण आपला पाहिजे तेवढा विकास करून घेऊ शकतो. आपण इंग्रज मनुष्याची बरोबरी करण्याची आस धरावी, हे योग्यच आहे. परंतु त्यासाठी चळवळ करणे ही जोखमीची गोष्ट आहे; तो कायमचा उद्योग असून चालणार नाही.

सध्याचा काळ अवघड आहे. सरकार अनेक संस्था बंद पाडत आहे. त्यामुळे आपली संस्था चालवणे हीदेखील मोठी जबाबदारी आहे. आपण ध्यानात घ्या की, तुमचे आयुष्य हे समर्पित आयुष्य आहे. तुम्ही आपल्या ठिकाणच्या





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सर्व निष्ठा आणि सामग्री यांच्यासकट तुमचे आयुष्य संस्थेला वाहिले आहे. तुमच्यापैकी प्रत्येकाने अशी जाणीव ठेवली पाहिजे की, तुम्ही हाती घेतलेल्या कामामुळे संस्था अडचणीत येऊ नये. संस्थेचा सन्मान आणि भविष्य तुमच्या कर्तृत्वावरच अवलंबून आहे.

'भारत सेवक समाजा'च्या सभासदांनी सार्वजनिक काम करताना सहा प्रकारची उद्दिष्टे समोर ठेवावीत, अशी गोखल्यांची शिकवण होती.

१) आपल्या उदाहरणाने व कार्यातून लोकांना मातृभूमीवर उत्कट आणि गाढ प्रेम करण्याची सवय लागली पाहिजे. त्यांना हेही कळले पाहिजे की, प्रेमाची परिणती देशसेवा व देशासाठी त्याग करण्याची तयारी यात व्हावयास हवी.

२) कार्यकर्त्यांनी लोकांना राजकारण करण्याचे व चळवळ करण्याचे शिक्षण द्यावे. लोकांना हे समजावून सांगावे की, प्रत्येक प्रश्नाचा सखोल अभ्यास करावा. राजकारण आणि चळवळ यांतून सार्वजनिक जीवन अधिक संपन्न व शक्तिशाली झाले पाहिजे.

३) देशात विविध जमाती व धर्म आहेत. त्यांच्यातील संबंध सद्‌भावपूर्ण आणि सहकार्याचे राहतील, याची खबरदारी घेतली पाहिजे.

४) स्त्रियांचे शिक्षण, मागासवर्गीयांचे शिक्षण, औद्योगिक शिक्षण व विज्ञानाचे शिक्षण यांची वाढ होईल, यासाठी मदत केली पाहिजे.

५) देशात उद्योगधंद्यांची वाढ व्हावी, यासाठी प्रयत्न करावेत.

६) मागासवर्गीय व दलित यांची उन्नती करण्यासाठी झटले पाहिजे.

(७)

गोखल्यांनी घालून दिलेल्या शिस्तीप्रमाणे गोखल्यांच्या हयातीत व त्यानंतरही 'भारत सेवक समाजा'चे कार्य फारसा गाजावाजा न करता पण तरीही देशातील सार्वजनिक जीवन विविध अंगानी समृद्ध करीत पुढे जात राहिले. आणि आजही 'समाजा' चे काम चालू आहे. गोखल्यांच्या हयातीतच मद्रास (१९१०), नागपूर (१९११), मुंबई (१९११) आणि अलाहाबाद (१९१३) इतक्या शाखा निघाल्या होत्या. गोखल्यांच्या मृत्यूनंतर अंबाला, कटक, आणि कोझीकोडे (केरळ) इथे शाखा जरी नाहीत तरी कार्यालये उघडण्यात आली. पुण्यातील आर्यभूषण छापखाना आणि मुंबईतील मुंबई वैभव छापखाना या दोघांचे काम बघण्यासाठी स्वतंत्र शाखा गोखल्यांनी तयार केली होती. 'समाजा' तर्फे 'ज्ञानप्रकाश' (पुणे), 'हिंदुस्थानी' (लखनऊ येथील उर्दू साप्ताहिक) व नागपूर येथे 'हितवाद' अशी वर्तमानपत्रे चालविली जात. त्यांपैकी 'हितवाद' अजून चालू आहे. 'द सर्व्हंट ऑफ इंडिया' नावाचे एक मुखपत्र १९१८ साली सुरू करण्यात आले होते. ते १९३९ साली बंद पडले.

नामदार गोखले हे नेमस्त पक्षाचे होते आणि ब्रिटिश सरकारने हिंदुस्थानात आपल्या सुधारणांद्वारे हिंदी लोकांना जे प्रतिनिधित्व सरकारी अधिकार मंडळावर दिले होते, त्यांचा जास्तीत जास्त उपयोग करून सामान्य लोकांचे हित साधावे, असा त्यांचा प्रयत्न असे. गोखल्यांचे हेच राजकारण गोखल्यांनंतर 'समाजा' चे 'प्रथम सभासद' झालेल्या श्रीनिवास शास्त्री यांनी आयुष्यभर चालवत ठेवले. श्रीनिवासशास्त्री प्रथम मद्रास प्रांताच्या परिषदेवर होते. माँटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणानंतर दिल्ली मध्ये केंद्र सरकारची दोन संसदीय मंडळे स्थापन करण्यात आली. या दोहोंपैकी कोणत्या ना कोणत्या मंडळांवर शास्त्री नेहमी सभासद होते. महात्मा गांधींच्या असहकार चळवळीला नेमस्त पक्ष आणि शास्त्री या दोघांचाही विरोध होता. सरकारशी असहकार करून नव्हे तर सरकारी कामात अधिकाधिक भाग घेऊन आपण हळूहळू सर्व सूत्रे हिंदी माणसांकडे आणावीत, असे त्यांचे धोरण होते. १९१८ साली नेमस्त पक्ष काँग्रेसमधून बाहेर पडला. पण गांधींची अस्पृश्योद्धार, मूलभूत शिक्षण, स्वदेशी व ग्रामोद्योग अशी विधायक कार्ये होती, त्याला समाजाचा कायमच पाठिंबा राहिला.

नामदार गोखले यांनी परदेशवासी हिंदी लोकांचे हक्क आणि स्वातंत्र्ये यांचा पाठपुरावा केला होता. गांधींच्या दक्षिण आफ्रिकेतील चळवळीस गोखल्यांनी पाठिंबा दिला व त्या देशाला त्यांनी भेटही दिली. श्रीनिवास शास्त्री यांनी हेच कार्य आणखी पुढे नेले. दक्षिण आफ्रिकाच नव्हे तर केनिया, युगांडा येथील हिंदी लोकांचे प्रश्नही त्यांनी हाताळले. इंग्रज सरकारच्या पाठिंब्यानेच शास्त्रींनी


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

परराष्ट्र व्यवहारातही मोठा भाग घेतला. पहिल्या महायुद्धानंतर जी शांतता परिषद भरली, त्या परिषदेवर भारताचे प्रतिनिधि म्हणून सरकारने त्यांना पाठवले. जिनिव्हा व वॉशिंग्टन येथील परिषदांत त्यांनी भाग घेतला.

१९३०, ३१ व ३२ साली लंडनमध्ये गोलमेज परिषदा भरल्या. या परिषदांतही शास्त्री यांनी महत्त्वाची भूमिका घेतली. दुस-या गोलमेज परिषदेला गांधींनी यावे यासाठी शास्त्रींनी त्यांचे मन वळवले. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर पंडित हृदयनाथ कुंझरू हे 'समाजा' चे अध्यक्ष झाले. ह्यांनीही फार महत्त्वाची कामे केली. राज्य पुनर्रचना आयोगाचे ते सभासद होते. परराष्ट्र व्यवहाराचा कुंझरूंचा मोठा अभ्यास होता. 'इंडिया इंटरनॅशनल सेंटर' या संस्थेची स्थापना कुंझरूंनी केली. कुंझरू अनेक वर्षे राज्यसभेचे सभासद होते.

स्त्रीशिक्षण आणि मागासवर्गीयांचे शिक्षण या दोन क्षेत्रांकडे 'समाजा' ने प्रथम पासूनच लक्ष पुरवले. गो. कृ. देवधर यांनी सेवासदन संस्था वाढविली व तिची मुंबईत शाखा काढली. निराधार स्त्रियांना शिवणकाम, विणकाम, हस्तोद्योग, पाककला अशा उपयोगी कौशल्यांचे शिक्षण देऊन स्वतःच्या पायावर उभे राहण्याचे सामर्थ्य देणे, हा या संस्थेचा उद्देश होता. सेवासदन संस्था आजही कामे करीत आहे. आदिवासी मुलांसाठी शाळा काढणे, त्यांच्या आरोग्याची काळजी घेणे याकडे समाजाचे मोठे लक्ष होते. नीलगिरी पर्वतातील 'तोडा' या जमातीसाठी आश्रमशाळा संस्थेने काढल्या होत्या; त्याचप्रमाणे आयुर्वेदिक औषधे पुरविण्याचे दवाखाने काढले होते. गुजरातेत श्री. ठक्करबाप्पा यांनी 'बाहरवटिया' जमातीच्या लोकांत अनेक वर्षे काम केले. हे लोक वाटमारी करून पैसे मिळवीत असत. त्यांचें हृदयपरिवर्तन करून, त्यांच्या मुलांसाठी शाळा चालवून ठक्करबाप्पांनी या गुन्हेगार जमातीला सन्मार्गावर आणले.

पहिल्या महायुद्धात मुंबईच्या गिरण्यांनी अचाट नफा कमावला. मात्र त्यांनी कामगारांना त्यातील वाटा दिला नाही. युद्ध संपल्यावर मंदीची कारणे दाखवून पगार कमी करण्याचा घाट घातला. त्यामुळेच कामगारांचे प्रश्न चिघळले. अशा कसोटीच्या वेळी समाजाचे कार्यकर्ते ना. म. जोशी यांनी मुंबईतील कामगारांत काम करण्यात सुरुवात केली

सहकारी चळवळ ही ग्रामीण भागातील लोकांना पैशाचा आधार पुरविणारी अतिशय समर्थ चळवळ आहे, हे गोखल्यांनी ओळखले होते. १९०४ साली सरकारने सहकार खाते तयार करून सहकारी संस्था नोंदणी कार्यालय सुरू केले. तेव्हापासून 'ज्ञानप्रकाश' व 'भारत सेवक समाज' यांनी सहकाराच्या कामाला पाठिंबा दिला होता. अनेक तालुंक्यातून सहकारी पतसंस्था 'समाजा' च्या कार्यकर्त्यांनी स्थापन केल्या. शेतक-यांची कर्जबाजारी अवस्था संपवण्यासाठी मुंबई, संयुक्त प्रांत, मध्यप्रांत, अशा निरनिराळ्या प्रांतांत 'समाजा' ने सहकाराचे जाळे पसरवले. ही 'समाजा'ची मोठी उपलब्धी होती.

याखेरीज वेळोवेळी दुष्काळ, पूर, रोगराई अशी संकटे उद्भवत असतच. या प्रत्येक ठिकाणी भारत सेवक समाजाने आपल्या परीने आणि विशेष बोभाटा न करता लोकांची दुःखे व अडचणी कमी करण्यास खूप मदत केली व हे काम सतत २५ वर्षे चालवले. कामगार चळवळीच्या इतिहासात जोश्यांचे योगदान फार महत्त्वाचे आहे.

जरा वेगळ्या पद्धतीचे परंतु अतिशय महत्त्वाचे असे जे काम समाजाने केले ते म्हणजे 'गोखले अर्थशास्त्र संस्था' स्थापन करून चालविण्याचे. १९३० साली समाजाला साता-याचे श्री. काळे यांनी रु. १ लाख इतकी देणगी दिली. त्यातून अर्थशास्त्र व राज्यशास्त्र या विषयांत मूलगामी संशोधन करणारी ही संस्था निर्माण झाली. या संस्थेतील संशोधकांना 'समाजा'च्या ग्रंथालयाचा उपयोग करण्याची परवानगी होती. योजनांचे काय परिणाम होतील व त्या योजनांची सुयोग्य कार्यवाही कशी चालेल याविषयी सर्वेक्षण व अहवाल करण्याचे काम स्वातंत्र्यपूर्व काळातदेखील गोखले अर्थ व राज्यशास्त्र संस्थेकडे सोपवले जाई. स्वातंत्र्यानंतर देशात नियोजनाचे युग सुरू झाले. या कामात सरकारला फार मोठे साहाय्य गोखले अर्थशास्त्र संस्थेने केले. संस्थेचे पहिले संचालक डॉ. धनंजयराव गाडगीळ हे पुढे भारतीय नियोजन आयोगाचे उपाध्यक्ष झाले.

या सर्व आढाव्यावरून हे ध्यानात येईल की, गेल्या शतकाच्या सुरुवातीला देशातील सार्वजनिक जीवनावर,

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

गोखल्यांच्या मते, जी एक झुंडशाहीची अवकळा पसरण्याचा धोका होता त्यास आळा बसावा, आणि तळागाळातील लोकांची सेवा, स्त्रिया व मागासवर्गीय यांचे शिक्षण, नेमस्त राजकारण अशा विविध क्षेत्रांत अभ्यासू वृत्तीने व सातत्याने कार्य करणा-या तरुण लोकांची एक तुकडी तयार करावी व तिच्या योगाने देशातील सार्वजनिक जीवन समृद्ध व्हावे, हा गोखल्यांचा उद्देश 'भारत सेवक समाजा' च्या कार्यातून सिद्धीस गेला. आजही 'समाजा' चे कार्य चालू आहे. त्यात काही अपप्रवृत्ती शिरल्या आहेत, अशी बोलवा अधूनमधून ऐकू येते. पण तो वेगळा विषय आहे.

(सध्या गोखल्यांच्या मृत्यूचे शताब्दी वर्ष चालू आहे. त्यासाठी हा लेख.)

**संदर्भ ग्रंथ :**

(1)David Gilmour : Curzen.. Ferar, Straus & Giroux. New York 2006.

(2) Ed. S. R. Venkatraman : Gokhaleana.SCS Madras Branch. Issue 1964-65.

(3) न. चिं. केळकरः लो. टिळक यांचे चरित्र.(खंड १ ला). पुणे १९३३.

(4) Ed Verinder Grover: Political Thinkers & India. (vol 2) Gopal Krishna Gokhale. Deep and Deep publication. New Delhi1991.

(5) Ed. T.Y. Jagadisan : A selection of speeches & writing of Rt.Hon. Shriniwas shastri. Model Publications, 50 Badrioan street Madras 1946.

(6) P. Kodanda Rao: Rl. Hon. V. S. Shrinivas Shastri. A political Biography. Asia publishing House, Bombay 1963.

**टीपा.**

(१) [१] मधील १२ वे प्रकरण.

(२) गणेश व्यंकटेश जोशी हे आकडे शास्त्रज्ञ होते.

(३) [२] मध्ये C.R. Reddy यांनी ४/२/२० रोजी केलेले भाषण छापले आहे, ते पाहावे.

(४) [३] मधील पान ५४६ व पुढे.

(५) [३] मध्ये पान ६०८.

(६) [२] मधील नटराजन यांचे व्याख्यान.

(७) [४] मधील R. B. Nanda यांचा लेख.

(८) [२] मधील C. R. Reddy यांचे व्याख्यान.

(९) [५] मधील पान ९९.

(१०) [५] मधील पान १०३.

(११) [५] मधील पान ८८-८९.

(१२) [५] मधील पान ७८.

✷✷✷



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# वाल्मीकी रामायण

प्रभा तुळपुळे

सीता शालीन (docile) व स्वतःचे व्यक्तित्व विलोप करणारी व्यक्ती होती का? स्त्रीमुक्ती आणि अन्य पुरोगामी चळवळींनी सीतेचा यासाठी धिक्कार केला आहे. सीतेला प्रस्थापित समाजाने आदर्श मानले आहे तेही यासाठीच. तिने पुरुषप्रधानतेपुढे मान तुकविली, तिने पती म्हणून व धर्मनिष्ठ राजा म्हणून रामापुढे झुकणे योग्य मानले. याकरिता परंपराबद्ध हिंदू विचारधारेने सीतेचा आदर्श नाचवून स्त्रीला चाकोरीबद्ध आणि पुरुषाच्या पूर्व नियंत्रणात ठेवायचा प्रयत्न केलेला दिसतो.

पण वाल्मीकीची सीता अशी आहे का? इ. स. पू. २०० ते इ. स. २०० असा रामायणाचा लेखनकाळ आहे. त्यात सीता ही उत्साहाने मुसमुसलेली व भावनोत्कट व्यक्ती असून तिला स्वतःचे मन आणि मत आहे, ती स्वतःचे निर्णय स्वतः घेते आणि या स्वयंनिर्णयाच्या हक्कासाठी लढा देते, असे दाखविले आहे.

राम-सीतेच्या प्रणयाराधनात पारस्परिकता आहे. विरहाची आर्तता व मिलनाची परमतृप्ती या भावना दोघांनाही तितक्याच प्रकर्षाने जाणवल्या आहेत. दोघांनीही त्या प्रगट केल्या आहेत.

सीता वनात जायला का निघाली? रामाने वनात जावे की नाही, न्याय्य-अन्याय्य काय, यासांबंधी ती काही बोलली नाही. त्याने जायचे ठरविले, त्याला तिची संमती आहे. पण स्वतःही रामाबरोबर जाणार हा सीतेचा स्वतःचा निर्णय आहे. रामाला तो मान्या नाही. सीता सुकुमार, राजवैभवाची सवय असलेली इ. त्याचे आक्षेप. सीता तावातावाने त्याचा प्रतिवाद करते. इतकेच नव्हे तर वनवासातील साहसे, आनंद यांबद्दल उत्सुकताही प्रगट करते.

ती रामाला टोमणेही मारते. इतका दुबळा आहेस का की, माझे रक्षण तुला करता येणार नाही? असे विचारून पुढे म्हणते 'मी धरतीकन्या आहे. तुझ्या पुढेपुढे जाऊन वाटेतील काटे दूर करीन.' सीता रामाच्या पाठून खालमानेने हळूहळू चाललीय हे समाजमनातील दृश्य मग का बरे निर्माण झाले? पत्नीची जागा नेहमी पतीपाशी असते, असा विचार ती जरूर बोलून दाखविले. म्हणून ते अनेकापैकी एक कारण आहे हे खरे. दुसरे कारण हे की, ती राजनीतीही जाणते. राम गेल्यानंतर आपले अयोध्येतील जिणे वनवासापेक्षा नक्कीच वाईट असेल, हे तिला माहीत आहे. 'राजवाड्यातील कूटनीती तू जाणतोसच', असे ती म्हणते.

रावणाकडून जिंकून सीतेला परत आणल्यावर रामाचा पवित्रा रामालाच काय पण सर्वांनाच अचंबित करतो. 'मी एका मर्दासारखा वागलो, माझ्या इज्जतीच्या अपमानाचा कलंक धुऊन काढला, माझा पराक्रम (prowess) दाखवून दिला, असे त्याचे म्हणणे होते. सीतेला तो म्हणतो, 'मी तुझ्या प्राप्तीसाठी युद्ध लढलेलो नाही. पण माझ्या इज्जतीसाठी युद्ध केले.'

आपण एखाद्या स्त्रीच्या प्राप्तीसाठी एवढा प्रयास केला, हे कबूल करणे भारतीय पुरुषाला आजवर जड गेले आहे. आपल्यापाठी अनेक स्त्रिया लागल्या आहेत असे वाटून घ्यायला त्यांना आजही आवडते. भावे, गाडगीळ, भागवत यांची आत्मकथने पहावीत. यांची प्रेमलग्ने, पण त्यात पुढाकार त्यांच्या स्त्रियांनी घेतला. भाव्यांनी सासरा लग्नाला विरोध करतो. म्हणून चेतून लग्न करून दाखविले. गाडगीळ, भागवतांनी विचार करायला भरपूर वेळ घेतला. चोरघड्यांचेही तसेच. आणि ह. वि. मोटे अस्वस्थ होते. पण लीन कधीच झाले नाहीत. Go with my permission.where ever you wish. माझ्या परवानगीने तुला वाटेल तिथे तू जा, असा हा पवित्रा आहे.

विविध सीता रामाच्या या वक्तव्यानंतर सीता विलाप करते. पण नंतर निषेधही करते. म्हणते, 'इतक्या क्रूरपणे आणि अयोग्य पद्धतीने तुम्ही माझ्याशी बोलूच कसे शकला? मला जो कोणी स्पर्श केला, ते टाळणे मला

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शक्य नव्हते. पण माझ्या नियंत्रणाखालील माझे मन आणि भावना मात्र तुमच्यावरच केंद्रित होत्या..... इतक्या वर्षांच्या घनिष्टतेनंतर जर तू मला ओळखत नसशील, तर माझा विनाश अटळच म्हणायचा.'

म्हणजे तिच्या मते रामाचे हे अपयश आहे आणि तेही समजुतीच्या आणि संवेदनेच्या स्तरावर. ती लक्ष्मणाला चिता प्रज्वलित करायला सांगते. लक्ष्मण रामाकडे पाहतो. खाली मान घालून असलेला राम हलकेच होकारार्थी मुंडके हलवतो.

सीता उडी घेते तेव्हा देवदेवता रामाची निर्भर्त्सना करतात. 'रामा तू या विश्वाचा रक्षक, बुद्धिमान पुरुष; सीतेला चितेत उडी घेताना स्वस्थपणे पाहत राहतोस?'

सीता अग्नीतून धीरगंभीर आणि अचल अशी बाहेर पडते. तिचे रामावरील प्रेम तिने जरूर व्यक्त केले, पण तिला आपली प्रतिष्ठाही महत्त्वाची वाटली. बलशाली राजा, प्रभावशाली पितृप्रधान समाजरचना, सीतेने प्रतिकार केला, पण जमवूनही घेतले. तिने तडजोड केली हे तिच्या व्यक्तिमत्त्वाला कमीपणा आणते का?

**लोकसाहित्य - कंबन रामायण**

"सीतेची पीडा आणि क्रोध दोन्ही कंबनने परमावधीचे दाखविले आहेत. 'देवांना सर्व ज्ञान असेल, पण एका स्त्रीचे हृदय त्यांना जाणता येते का? सीता अग्नीसमीप जाताच सर्व विश्व, पंचमहाभूते, सर्व देव, चारी वेद, धर्म, पशुपक्षी, मानव सर्व भयाक्रांत होऊन आक्रोश करू लागले." तिच्या धगधगत्या एकनिष्ठेचे चटके अग्नीला बसू लागले. अंगातून घामाच्या धारा पाहणा-या त्या सीतेला उचलून धरून अग्निशिखांनी रामाला विचारले, "सीता भस्मसात झाली तर यापुढे कधी पृथ्वीवर पर्जन्यवृष्टी होईल? धरती विश्वाच्या ओझ्याखाली दुभंग झाल्याशिवाय राहील?"

एकनिष्ठ स्त्रीच्या सामर्थ्याचे हे वर्णन आहे. तिच्या शापाने ब्रह्मांडाचा नाश कसा होऊ शकतो, हे थोडक्यात सांगितले आहे.

"पुनः एक परीक्षा. सीतेंच्या त्यागानंतर कित्येक वर्षांनी राम मुलांना स्वीकारतो. रामाला पश्चात्ताप होतो. तो सीतेला बोलावतो. दुःखी हताश सीता पुन्हा एकदा आपल्या एकनिष्ठेची ग्वाही रामाला देते. पण आता रामाबरोबर राहण्याऐवजी, मृत्यूला पसंत करते. सीता विधियुक्त आत्महत्या करते.

"सीतेने काय नाकारले? ती पुनर्मिलन नाकारते. पुन्हा एकदा परित्यक्त अवस्थेतील छळवाद सुरू होण्याची शक्यता नाहीशी करते."

ही आत्महत्या तिने का केली? रामावरचा तिचा राग तिने स्वतःकडे का वळविला? त्याला दोष देण्याऐवजी ती स्वतःला नष्ट करते की आता तिचा जीवनहेतू पूर्ण झाला आहे असे ती मानते? या जगातले तिचे काम पूर्ण झाले आहे म्हणून पुन्हा एकदा धरतीच्या–विश्वाच्या त्या महान मातेच्या– प्रसवशील पंचमहाभूतांत विलीन होते?

**सीता हा लक्ष्मीचा अवतार आहे का?**

एकदा रामाला विष्णूचा अवतार मानल्यावर सीतेला लक्ष्मी म्हणणे भागच आहे. पण शोध घेता असे दिसते की सीतेचे नाव वैदिक ग्रंथांत आहे. पुराणांतही आहे. रामाचे नाव वैदिक ग्रंथांत नाहीच. पण पुराणांतही फारसे नाही. वैदिक ग्रंथात सीता निसर्गदेवता आहे. इसवीसनाच्या सुरुवातीपासून ती एक प्रभावशालिनी देवता आहे.

वैदिक काळानंतर आर्य-अनार्य देवतांची पुनर्मांडणी झाल्याचे दिसते. सांख्यदर्शनातील प्रकृतीला, भौतिक 'सृजनशीलते' ची, पुरुषाची सहचरी बनवून टाकले आहे. त्याआधी सीता प्रकृतिविश्वाच्या केंद्रस्थानी होती, मूलतत्त्व होती. पुढे त्रिमूर्तीची कल्पना आली आणि सर्व देवतांना ब्रह्मा-विष्णू-महेशाच्या बायका बनवून टाकल्या. सरस्वती ब्रह्माला, पार्वती शिवाला, आणि लक्ष्मी विष्णूला दिली. पुराणात प्रत्येक सीतेचा एक कल्याणकारी व एक विनाशकारी पैलू असल्याचे भान राखले गेले आहे.

वैष्णव तांत्रिकांच्या पंचरात्री पंथाने लक्ष्मीचे विभाजन केले आहे. मंगलकारी गुण, सृजन, संगोपन आणि शोभा हे गुण नव-याच्या नियंत्रणाखाली वागणा-या पतिव्रता लक्ष्मीला दिले आहेत. प्रलय, विभाजन, विलय इत्यादी गुण अविवाहित किंवा वांझ स्त्रियांना बहाल केले आहेत. या विचारधारेनुसार सीता ही नियंत्रित पत्नीच्या रूपात कल्याणकारी गुणाची मंडित अशी आहे. यातून पुढे अलक्ष्मी किंवा अवदसा ही कल्पना पुढे आली.

रामायणात अवदसेच्या रूपात शूर्पणखेचे पात्र आले



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहे. शूपर्णखा उद्दंड आहे. दुष्ट आहे, ती जंगलात एकटी फिरते. विवाहाचा विचार नसताना मुक्तपणे कामवासना प्रकट करते. ती लोभी आहे, बीभत्स आहे, सूडभावनेने पेटलेली आहे.

भारतीय परंपरेने अलक्ष्मीला धिक्कारलेले आहे, निदान अव्हेरलेले आहे. तरीसुद्धा लक्ष्मी आणि अलक्ष्मी ही जुळी भावंडे (alterego) आहेत. एका नाण्याच्या दोन बाजू आहेत.

शूपर्णखा तिच्याकडे असणा-या विद्येच्या द्वारे सीतेचे रूप घेते, असे कंबनाच्या रामायणात दाखविले आहे. पुढे ही शूर्पणखा रामावर मोहित होते व त्याला आपल्याशी लग्न करायला सांगते. (फक्त कामसुख मागत नाही.)

रामाचे आक्षेप काय? (कंबन) १) ती ब्राह्मणी, तो क्षत्रिय, लग्न कसे होणार? २) तिच्या भावाने प्रस्ताव मांडून लग्न करून दिल्याशिवाय तो काय करू शकणार? ३) सीता तेथे येताच घाबरून गर्भगळीत होते. म्हणूनही राम शूर्पणखेला हाकलून देतो.

दुस-या दिवशी शूर्पणखा सीतेला पळवून नेऊन लपवून ठेवण्याच्या हेतूने येते, तेव्हा लक्ष्मण तिचे नाक, कान व स्तन कापतो.

शूर्पणखेचा आग्रह कायम रहातो. रामाने आपल्याशी लग्न केले तर युद्धात साह्य करण्यासाठी आपल्यासारखी बळकट शूर सखी त्याला मिळेल. सीतेसारखी दुबळी स्त्री काय कामाची? असा युक्तिवाद ती मांडते.

वाल्मीकी रामायणातील शूर्पणखा अशीच मुक्त स्त्री आहे. तुला सवत कशी काय सहन होणार, असे राम तिला विचारतो. शूर्पणखा कुठेही दुय्यम स्थान घेणारी स्त्री नव्हे. पतीच्या नियंत्रणात राहणारी स्त्रीही नव्हे. जंगलात मुक्त संचार ती लीलया करते. आपल्या मनाने व आपल्या सामर्थ्याच्या जोरावर आपण जीवनमापन करतो, असे ती मानते. संसारी माणसाला तिचे भय वाटते. इतके असूनही पुरुषाच्या मनाला ती कुठेतरी भुरळही घालते. राम घोटाळतो, थोडा चिडवतो, थोडे विनोद करतो. तिला एकदम व ठामपणे नकार देऊन घालवून टाकत नाही. काही कवींनी रामाचे शूर्पणखेवर मन गेले होते. अयाी कल्पना केली आहे.

अत्यंत विरुद्ध प्रकारच्या या दोन स्त्रिया; सीता आणि शूर्पणखा. पण न्यायप्रिय माणसांच्या पितृप्रधान कल्पनांनुसार दोघींनाही सारखेच दुःख भोगावे लागते. वर्तमान काळी जर स्त्रियांनी शूर्पणखेऐवजी सीतेचा आदर्श कवटाळला असेल, शूर्पणखेला नाकारले असेल, तर त्याचे कारण सीतेचे जीवन भयानक, तर शूर्पणखेचे त्याहून विदारक, हेच असावे.

शिवाय स्त्रिया मूलतः अविश्वासार्ह असतात, हे समाजमनावर बिंबलेले तत्त्व आहे. त्यामुळे त्यांना पक्के नियंत्रणाखाली ठेवले पाहिजे. सीता रावणाकडे जिवंत राहिली म्हणजेच तिने वैवाहिक चौकटीचा भंग केला. त्यामुळे ती पतिता बनली, शूर्पणखा बनली.

लोकमानसातही लक्ष्मीची पूजा केली जाते. उदा., दिवाळी प्रतिपदा. पण आदल्या दिवशी अलक्ष्मीची हकालपट्टी करण्यासाठी अनेक दीपज्योती प्रज्वलित केल्या जातात.

बंगालच्या लक्ष्मी उत्सवात तर अलक्ष्मीची बाहुली बनवून तिचे नाक-कान कापले जाते व मगच लक्ष्मीपूजन होते. (मात्र ही पूजा अमावस्येलाच असते.)

अशा वेळचे स्त्रियांचे एक गाणे पुढील प्रमाणे – मला रामासारखा पती मिळो, मी सीतेसारखी पवित्र राहो. माझ्या सवतीच्या नायनाट होओ. तिचे नाक-कान कापले जावोत. माझ्या नव-याला तिचा तिरस्कार वाटो. मी त्याची सर्वोत्तम प्रिया असावी. मला सोन्यासारखा मुलगा व्हावा.

तेलगू स्त्रियांमध्ये राम-सीतेच्या सहजीवनाच्या तपशीलाने भरलेल्या अनेक कथा व गीते आहेत. राम-सीता अनेक खेळ खेळतात. आणि नेहमी सीता जिंकते. सीता शिवधनुष्य लीलया उचलते.

निम्नस्तरीय तेलुगू स्त्रियांमध्ये एक गाणे आहे. त्यात सुवर्णमृग पाहिल्यावर सीता रामाचा म्हणते, 'मला जरा धनुष्यबाण दे. मी आता जाते आणि हरीण मारून आणते.' उच्चवर्णीयांची सीता मात्र लाडाने बिघडलेल्या मुलाप्रमाणे रामाकडे हट्ट करते.

तेलुगू गीतात आणखी एक गोष्ट आहे, जीत स्त्रियांची शूर्पणखेपेक्षा सीतेला अधिक पसंती असल्याचे दाखविले आहे. शूर्पणखा अयोध्येला तापसी वेशात जाते आणि सीतेला रावणाचे चित्र काढण्याचा आग्रह करते. सीता




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

फक्त अंगठा काढते आणि तेवढेच मला माहीत आहे असे म्हणतो. शूर्पणखा लगेच ते चित्र पूर्ण करते. आणि ब्रह्म्याच्या साह्याने ते जिवंत बनवते. सीता व अन्य स्त्रिया ते नष्ट करण्याच्या प्रयत्नात असतात, तेवढ्यात राम तेथे येतो. सीता ते चित्र बिछान्याखाली लपवते. राम झोपताच ते चित्र रामाला ढकलून खाली पडते. रागाने राम सीतेला हाकलून देण्याचा निर्णय घेतो. इतर सर्व स्त्रिया काय झाले ते रामाला सांगून रामाची समजूत काढण्याची प्रयत्न करतात. पण राम ऐकत नाही. तो तिला जंगलात नेऊन तिचा शिरच्छेद करायची आज्ञा लक्ष्मणास देतो.

पुढे रामाला एका यज्ञाच्या वेळी सीतेची जरुरी लागते. तो सीतेची सोन्याची मूर्ती बनवतो व आपल्या बहिणीला-शांतेला-मूर्तीस आंघोळ घालावयास सांगतो. शांता साफ नाकारते. रागाने विचारते, "सीतेला हाकलून देताना मला विचारले होतेस?"

या गाण्यात सीतेच्या परित्यक्त जीवनाकडे वेगळ्या नजरेनेही पाहिले आहे. सीतेला मिळालेल्या स्वातंत्र्याचा सीतेला आनंद होतोय. आता तिला रामासाठी जगायचा जाच नाही. अखेर ती रामावर विजय मिळवते, आपल्या दोन मुलग्यांकरवी. थोडक्यात सीतेचे जे चित्र – आज्ञाधारक, सर्मपिता, पतिपरायणा इ. इ. सुसंस्कृत जगाने पुढे आणले आहे, ते सामान्य स्त्रीला अनेकदा अमान्य झाले आहे.

सीतेला भजणा-या सामान्या हिंदू स्त्रियांवर सीतेचा प्रभाव व्यामिश्र व परस्परविसंगत पद्धतीने पडलेला दिसतो. या स्त्रियांनी सीतेची जी वर्णने केली आहेत, ती एका चैतन्यमय संपन्न व्यक्तिमत्त्वाची आहेत. रामाच्या प्रामाणिकपणाबद्दल त्यांनी संशय व्यक्त केला आहे. नव-याने केलेल्या आबाळीमुळे स्त्रीच्या जीवनात होणा-या यातनेला या वर्णनात प्राधान्य दिले आहे.

१५ व्या शतकात चंद्रावतीने बंगालीमध्ये रामसीतेची कथा लिहिली आहे आजही बांगलादेशात ती गायली जाते. यात सीता नायिका आहे. राम आदर्श तर सोडाच पण सामान्य माणसापेक्षाही कनिष्ठ आहे. तो दुबळा राजा, भित्रा पिता, नालायक नवरा व हलक्या कानाचा आहे.

सीता मात्र महाकाव्याच्य नायिकेच्या तोडीची आहे. तिची वेदनाही तेवढ्याच तोलामोलाची आहे. तपस्येच्या भोगातून निर्माण झालेली. "प्रवाहाबरोबर वाहत मी या तपोवनात आले आहे. उद्या मी कुठे असेन, कोण सांगू शकेल?"

मिथिलेमध्ये (बिहार) आताआतापर्यंत अवध (अयोध्या) मध्ये मुली द्यायच्या नाहीत, असा आग्रह असे.

वाल्मीकीचे रामायण, कंबनाचे रामावतरम्, दोन्हीमध्ये सीतेने आपली मते निर्भीडपणे मांडली आहेत प्रतिवाद केला आहे.

'मल्लीका साराभाई'चे सीतेच्या मुली (Sita's Daughtes) असे एक नृत्यनाट्य आहे. सीता- एक खंबीर स्त्री, आपल्या दुर्बळ मनाच्या नव-यामुळे अडचणीत सापडते. रामाचे वर्णन करताना सीता म्हणते– "राम एक सुकुमार नाजूक राजपुत्र. अरण्यातील धकाधकीच्या जीवनात तगून रहायला त्याला माझी गरज होती. त्याला त्याच्या लढाया लढण्यासाठी सैन्य जमवावे लागले. रामाला पुरुषत्त्वाचा अहंकार होता. त्याला आपल्या पत्नीच्या शीलाचा पुरावा मिळवावा लागला, तो असा राजा होता, ज्याला आपल्या पत्नीला न्याय देता आला नाही."

स्नेहलता रेड्डींचे (१९५०) "सीता" नाटक प्रचंड खळबळ उडवून गेले. तिची सीता म्हणते, "चारित्र्याची पुतळी म्हणून मला आठवू नका, एक असहाय (defenceless) स्त्री, जिने आपल्या आत्मसन्मानासाठी झुंज दिली, अशी माझी ओळख असू द्या." इतिहासाने संपूर्ण सत्य कधीच नोंदविलेले नाही. समाजाने माझ्या छळवादाची पानेच्या पाने लिहून टाकली, आणि आपल्या पापावर पांघरूण घालण्याकरिता, माझ्या समर्पणाचा आणि पतिनिष्ठेचा उदोउदो केला. तुमचा पुरुषी अहंकार, त्यातला मुर्खपणा (absurdity) आणि अन्याय, अत्याचार यातून कदाचित मी क्रांतीचे बीज रोवले असेन." सीता म्हणते, "रामा, मी तुला नवरा, प्रियकर मानीत नाही; त्याहून अधिक म्हणजे मी तुला माझ्या अजून न जन्मलेल्या मुलांचा पिताही समजत नाही. माझ्या दुर्दैवाला मी उत्कट आनंदाने सामोरी जात आहे."

रामानंद तिवारींच्या टीव्हीवरील रामायण मालिकेत


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सीतेचे अत्यंत सपक, कलाहीन असे रूप दाखविले आहे. राम शिरच्छेदाची शिक्षा देतो तेव्हा ही सीता त्याला त्याच्या अपराधाची जाणीव देत नाही. मरताना ती रामाला निर्दोष असल्याचे सर्टिफिकेट देते आणि आपणच आपले जीवन संपविण्याचा निर्णय घेतला, असे सांगते. आजच्या पुरुषप्रधान समाजाला स्त्री निमूटपणे सुळावर जाणारी हवी आहे.

✷✷✷

अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# तेंडुलकर – आठवणारे + आकळणारे...

चंद्रशेखर बर्वे

तेंडुलकर म्हणजे विजय तेंडुलकर. हे नावच पुरेसं बोलकं आहे, तेव्हा फोड करून ओळख सांगायची गरज नाही.

त्यांच्यावर आतापर्यंत अनेकांनी लिहिलंय, मीही पूर्वी अनेकदा लिहिलंय; मग हे मी पुन्हा का लिहितोय?

मला काही वेगळं सांगायचंय. मला दिसलेले-भेटलेले, त्यातून समजलेले तेंडुलकर इतरांना दाखवायचे आहेत, म्हणून हे पांढ-यावर काळं!

वेगळं सांगायचंय असं मी म्हणतोय, कारण ते माझ्या आठवणींवरआधारित आहे; अन् माझ्या आठवणी या माझ्या असल्यामुळे, त्यांतून मला कळलेले तेंडुलकर निराळे असूही शकतील, असं मला वाटतंय.

आरसा असेल तसं प्रतिबिंब/ प्रतिदर्शन-छोटं/मोठं, तुकड्या-तुकड्यांचं/ संपूर्ण-एकसंध. कदाचित ते परिपूर्ण नसेलही; पण इतरांना दाखवण्याजोगं/ इतरांनी पाहण्याजोगं ते असूही शकेल.

कधीकधी काळं (सावळं) हेदेखील उजळ, लोभसवाणं (एखाद्या वेळी अधिक देखणं) असतं!

'अधिक देखणे तरी निरंजन पाहणे....' असो.

नांदी जरा लांबलीच (नमन म्हणू या वाटलं तर); आता मुख्य 'प्रयोग' (म्हणजे कीर्तन) सुरू करणं बरं, नाही का?

१९४८ सालापर्यंत तेंडुलकर पुण्यातच होते. टिळक रोडवर 'निळकंठ प्रकाशना'जवळ राहत. तिथून मी पूर्वी राहत होतो ते घर अगदी थोड्याच अंतरावर होत. त्यामुळे जाता-येता तेंडुलकर दिसत. चिंतेत/चिंतनात गढलेले-सुन्न/ गंभीर एकदम शांत! चालणं संथ. कसलीच घाई नसल्यासारखं अन् काहीतरी (म्हणजे हरवलेलं नव्हे तर नवंनवं) शोधत असल्यासारखं..... हे माझं वाटणं किंवा शब्दांकन आजचं. त्या वेळी तेंडुलकर विशीत, मी दहा वर्षांचा; पण माझी आठवण पक्की. तेंडुलकरांची माझ्या मनावर उमटलेली अन् अजूनही स्मृतिपटलावर टिकून असलेली प्रतिमा अगदी सुस्पष्ट. लहानपणी शब्द तोकडे असले, तरी अबोध कळणं पल्लेदार असू शकतं.

तेंडुलकर मुंबई-पुणे/ पुणे-मुंबई करीत होते, पत्रकार लेखक म्हणून वाढत होते. मी ही शाळा संपवून (पुण्यात-S.P) कॉलेजात Jr. B. A च्या वर्गात दाखल झालो होतो, 'वाङ्मय मंडळा'च्या चर्चांत भाग घेत होतो.

एकदा प्रा. व. दि. कुलकर्णी यांनी नव्या नाटकांवर ('कक्षा', 'बाधा', 'माणूस नावाचे बेट' वगैरे) टिपणं लिहून चर्चा करा, असं आम्हां विद्यार्थ्यांना सांगितलं होतं. मी तेंडुलकरांच्या 'माणूस...' वर लिहिलं होतं. पुढे व. दिं. नी ते कॉलेजच्या नियतकालिकात– 'परशुरामीय'च्या १९५८ च्या अंकात– छापलंही होतं.

'माणूस...' चं त्या वेळी मला झालेलं आकलन बरोबरच होतं. पण त्यावरील माझ्या टिपणात शेवटी तेंडुलकरांबद्दल मी जे लिहिलं होतं ते चुकीचं होतं, त्यात तेंडुलकरांचा जो अधिक्षेप मी केला होता तो मुळीच बरोबर नव्हता, असं आज वाटतं.

मी लिहिलं होतं – "....एखाद्या श्रीमंतानं गरीब भिका-याच्या अंगावर किरकोळ नाणं फेकून तो-यात पुढं निघून जावं, तसे तेंडुलकर पुढच्या नाटकाकडे वळले आहेत. पण मराठी नाटक दरिद्री नाही (माधव मनोहर काही म्हणोत) अन् तेंडुलकर अजून 'श्रीमंत' नाहीत ('श्रीमंत' हे त्यांचं पहिलं नाटक)."

असं लिहिण्याचं साहसी स्फुरण मला कसं, कुठून आलं? एक शक्यता आहे - ओघात सांगून टाकतो. P. D. A च्या वर्धापनदिनी 'वेड्याचं घर उन्हात' नाटकाचा प्रयोग होता. दोन अंकांच्या मध्ये प्रमुख पाहुणे म्हणून ग. दि. माडगूळकर बोलले. ते म्हणाले – "तेंडुलकर ढीग पुढच्या नाटकाकडे वळले असतील (असं तेंडुलकरांनी म्हटले होतं), पण आम्ही कॉलर धरून त्यांना मागे खेचू..." त्या प्रयोगाला मी गेलो होतो,



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

माडगूळकरांचे हे छद्मी उद्गार मी ऐकले होते. त्यांच्या प्रभावातून, माझ्यातल्या उसळत्या तरुणाला चेव येऊन, मला 'ते' साहसी स्फुरण आलं असावं.

पण काही झालं तरी 'वॉशिंग्टनची कु-हाड' माझ्या लेखणीत शिरून तिनं तेंडुलकरांवर जो बेछुट आघात केला, तो निखालस गैर होता. तेव्हा तेंडुलकरांवर जो अन्याय करून मी चुकलो, तो दुरुस्त करून त्यांना नेमका न्याय देण्याचा प्रयत्न पुढे पंधरा वर्षांनी माझ्या पीएच. डी. च्या प्रबंधात व पुढे दहा वर्षांनी त्यावर आधारित पुस्तकातही मी केला. (ही हकीकत यथावकाश येईलच.) याचा अर्थ मी तेंडुलकरांना आतून जाणून घेत चाललो होतो.

माझ्या आकलनाची आंतरिक वाढ होत होती याला अनेक कारणं होती. पण त्यांत तेंडुलकर हे मुख्य/ महत्त्वाचं कारण होतं. त्याचं एक नभोनाट्य आणि त्यांच्याच दोन एकांकिका यांमुळे वाढीची प्रक्रिया सुरू झाली असं, त्या वेळचं एकेक आठवलं की, वाटतं. 'रात्र' हे 'आकाशवाणी' च्या राष्ट्रीय स्तरावरील स्पर्धेत पहिलं आलेलं नभोनाट्य. पुणे केंद्रावर ते मी ऐकलं. अनंत फाटक व कुमुदिनी गडकरी यांनी ते सादर केलं होतं. कमालीची पकड होती त्यात. 'मादी' ही एकांकिका डॉ. लागू व विजया मेहता (तेव्हा खोटे) यांच्या जबरदस्त समर्थ अभिनयातून साकार झालेली जवळून पाहिली. पुण्यातील B. M. C. C. च्या छोट्या हॉलमध्ये म्हणजे 'इंटिमेट थिएटर' मध्ये. 'चार दिवस' ही एकांकिका बघितली. पुण्यातीलच 'भानुविलास'मध्ये लीला अर्जुन वाडकर यांनी एकटीनं (एकटीनं, कारण त्यांची शकूची भूमिकाच प्रधान होती, सर्वाधिक महत्त्वाची होती). या ऐकण्यापाहण्याचा एकवट परिणाम असा झाला की, तेंडुलकरांचं लेखन वरवर वाटतं तसं साधं सपक नाही, हे लक्षात आलं. दुसरं असंही ध्यानात आलं की, साध्या शब्दांचा कमीत कमी वापर करून, खोल, गुंतागुंतीचा, विलक्षण ताण आणणारा 'नाट्यानुभव' व्यक्त करणारं त्यांचं लेखन ख-या अर्थानं काळजाला भिडायला हवं असेल, तर ते मनाच्या रंगभूमीवर जिवंत करता आलं पाहिजे. तरीही प्रत्यक्ष रंगभूमीवर ते जिवंत होताना येणारा रसरशीत अनुभव तिथं मिळेलच असं नाही. हे जसंजसं कळत गेलं, तसंतसं माझं एकूणच आकलन प्रौढ होऊ लागलं, त्यात प्रगल्भता येत गेली.

यानंतर मी तेंडुलकरांच्या नाटकांकडे, आवश्यकतेनुसार त्यांच्या इतरही साहित्याकडे, वळलो, हे एका परीनं चांगलंच झालं.

इथं तेंडुलकरांशी माझी पहिल्यांदा गाठ पडली- तेंडुलकरांची अन् माझी तर अनेकवार.

माझ्या पीएच. डी साठीच्या प्रबंधामुळे सुरू झालेली आठवणमालिका सावकाशच उलगडायला हवी.

'छोटी-सी गुडिया की लम्बी कहानी!' नीट अवधान देऊनच ऐकायलाही हवी.

माझ्या प्रबंधाच्या कहाणीला तसे फाटे बरेच आहेत. पण ते सोडून तेंडुलकरांशी संबंधित तेवढंच सांगणार आहे– थोडंदेखील तिखटमीठ न लावता!

१९७२-७३....

पुणे विद्यापीठाकडे माझा पीएच. डी साठी अर्ज...

विषय – तेंडुलकरांची नाटकं.

त्या वेळच्या अभ्यासमंडळातील एक ज्येष्ठ सदस्य नागपूरकडील विद्वान, संत-वाङ्मयाचे गाढे अभ्यासक यांचा विरोध. त्याचं म्हणणं, "तेंडुलकर म्हणजे रंगभूमीवरील गांडूळ."

ते सांगायला त्या वेळचे विभागप्रमुख – मराठीतील नामवंत साहित्यमीमांसक थेट माझ्या घरी. ते ऐकल्यावर झालेला संवाद–

"नव्या जीवशास्त्रीय संशोधनानुसार गांडुळामुळे शेताचा कस वाढतो, पिकाची प्रतवारी सुधारते."–मी

"असं आहे का? उलट जाऊन कानावर घालतो त्यांच्या. त्यांना सांगतो, तेंडुलकरांना कृमी/ कीटक म्हणा." – वि. प्र.

परिणाम? 'मराठी नाटक व तेंडुलकरांची नाटकं' असा विषय घेतलात तरच परवानगी देऊ–अखेरचा निकाल.

मान्य केलं. प्रबंधातील प्रकरणं वाढली; तेंडुलकरांची कमी नाही केली. पण एकूण मांडणी बदलावी लागली....

(असाच अनुभव नंतर, Post Doctoral Reserch च्या संदर्भात U. G. C. कडूनही आला. कालाय तस्मै नमः!) खुद्द तेंडुलकरांना कळवलं, त्यांच्याकडे आवश्यक



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सहकार्याची मागणी केली.

प्रथम ग्रासे मक्षिकापातः !

त्यांचं पत्र आलं – "मला विषय मान्य नाही....मी अजून लिहितोय, एवढ्यात पीएच. डी. – प्रबंधात माझ्यावर विशिष्ट शिक्का पडू नये." वगैरे वगैरे.

मी माझी भूमिका प्रांजळपणे कळवली.

"मी कोणत्याही गटासाठी लिहिणार नाही आहे, प्रबंध पुरा/ सादर होईपर्यंत (पुढे पुस्तक छापलं जाईपर्यंत) येणारें तुमचे प्रत्येक पुस्तक (केवळ नाटक असं नव्हे) मी विचारात घेणार आहे. दिवंगत लेखकावरदेखील एकदा लिहिलं की शेवटचं, वज्रलेप, असं कधी होत नाही. तुम्ही तर जिवंत झरा आहात. हे सगळं वाचल्यावरही तुम्ही नकारच देणार असाल तर अखेरचा रामबाण. हा विषय तुमच्या अखत्यारीतला नाहीच, विद्यापीठाच्या कक्षेतला आहे, त्यांनी तो अगोदरच मान्य केलेला आहे....." असं बरंच काही.

अपेक्षेप्रमाणे तेंडुलकरांनी सहकार्य करण्याचं एकदम कबूल केलं. पण....

पण दोन अटी घातल्या – एक; मी जे सांगेन ते माझ्या नावानं प्रबंधात/ पुस्तकात वापरायचं नाही. दोन, मी तुमचा प्रबंध संपूर्ण सारांश वाचेन; पण तो 'Submit' होईपर्यंत त्यावरचं माझं मत सांगणार नाही.

या दोन्ही अटी मी तत्काळ कबूल केल्या.

प्रबंधलेखन हळूहळू गती घेत होतं, पुढं पुढं सरकत होतं. तेंडुलकरांच्या माझ्या भेटी होत होत्या– कधी पुण्यात, कधी पार्ल्यात – त्यांच्याच घरी, पुण्यात बहुतेक वेळा प्रकाश रानडे यांच्या घरी (पलीकडेच तेंडुलकरांचं मूळ घर होतं, पण तिथ निवांतपणा नव्हता), एक दोन वेळा मधू गानूंच्या घरी. तेंडुलकर मला काही सांगत, ते मी माझ्यासाठी टिपून घेई. माझं एकेक प्रकरण शब्दन्शब्द पूर्ण वाचन. मी समोर बसून त्यांच्या मुद्रेवर/ डोळ्यांत बदलणारे भाव न्याहाळे – प्रबंध वाचतानाही त्यांचा चेहरा सुंदर दिसे, चेह-यामागील वाचायला मी तेंडुलकरांपासूनच शिकत/जमवत गेलो, त्यांच्या आंतरिक प्रतिक्रियांचा अंदाज मला बांधता येऊ लागला. त्या बहुधा प्रतिकूल नसाव्यात. अनुकूल किती, याचा ठाव लागायला वेळ लागे – कारण, तेंडुलकर उथळ तर नव्हतेच; उलट, चांगलेच खोल होते.

माझं लेखन खूप वेग घेत नव्हतं, कारण कॉलेज करून ते जमेल तसं/ तेवढं होत असे. कॉलेज 'स्टडी लीव्ह' देत नव्हतं, म्हणून पुढे 'मेडिकल लीव्ह'चा उपयोग करावा लागला. मध्यंतरी मला 'भाभा फेलोशिप' मिळवून देण्यासाठी तेंडुलकरांनी मनापासून प्रयत्न केले. ती सहज मिळालीही असती, पण मिळून उपयोग नव्हता, कारण त्यांच्या शर्तीप्रमाणे 'फेलोशिप'च्या काळात मला कॉलेजची सेवा खंडित करावी लागणार होती, आणि हे मला परवडणारं नव्हतं.

शेवटी प्रबंध सादर (Submit) झाला. मग मी तेंडुलकरांना विचारलं की आता त्याविषयीचं तुमचं मत सांगणार का? ते म्हणाले – " 'सत्यकथा' मासिकातील ('तेंडुलकर : एक जिंकणे, एक हरणे' या) लेखात गो. मं. ची (गो. म. म्हणजे प्रा. गो. म. कुलकर्णी) फसगत झाली आहे, तशी तुमची झालेली नाही." मी म्हटलं - - "हा Left handed complement झाला" यावर ते हसून म्हणाले "हा complement माझा (म्हणजे तेंडुलकरांचा) आहे." तेंडुलकर डावखुरे नव्हते, डाव्या पक्षाचेही नव्हते; पण complement मात्र left handed!.... याचा मतलब, प्रबंधाचं पुस्तक करायच्या वेळी समजला.

तेंडुलकरांचं म्हणणं होतं की, पुस्तक करताना, प्रबंधाचा 'फॉर्मॅट' (ढाचा) बदलायला हवा. त्यांनी काही नावं कळवली होती, अन् सुचवलं होतं की, त्यातल्या दोघांच्या सूचना लक्षात घेऊन पुनर्लेखन करावं. मला हे पटत नव्हतं. पुढील अभ्यासकांना प्रबंधढाचाही कळला पाहिजे, असं मला वाटत होतं. प्रबंधाचं पुस्तक करताना काही कमीजास्त करायला मी तयार होतो. शिवाय, अमूकतमूक शिष्टानं फारसा विचार न करता, अभ्यासपूर्वक, पद्धतशीर, बंदिस्त मांडणी करणा-याला काही सांगावं अन् ते त्यानं मुकाट ऐकावं, ही दंडेली काय म्हणून? लेखकाचं स्वातंत्र्य महत्त्वाचं, तसं अभ्यासकाचं नाही का? ते जपण्यासाठीच, 'मौजे'कडे पुस्तक देऊ म्हणणा-या विद्याधर पुंडलिकांना मी ठाम नकार दिला. माझं स्पष्ट म्हणणं होतं की, तुम्ही बर्व्यांना मूर्ख म्हणा, अन् दुस-या कोणा शहाण्याला वेगळं



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लिहायला सांगा. तेंडुलकरांनी यावर मौन पतकरलं. आतून ते नाराजही झाले असावेत! पुस्तक प्रकाशित झाल्यावर त्यांचं पत्र आलं – "चांगलं काढलंय प्रकाशकांनी." माझ्या विचाराशयाबद्दल त्यांनी चकार शब्दही लिहिला नाही.

मुंबई, अहमदाबाद, कलकत्ता, दिल्ली, बंगळूर येथील अभ्यासकांना त्यांनी माझं नाव सांगून माझा पत्ता दिला. "बर्व्यांनी फारच चांगला अभ्यास केलाय, त्यांना भेटा, त्यांचं मार्गदर्शन घ्या," असंही त्यांनी आवर्जून सांगितलं, पण जाहीरपणे माझ्या कामाचं किमान कौतुकही कधी केलं नाही.

अपवाद, २००६ मध्ये, त्यांचं आयुष्य सरत आल्यावर, त्यांनी मला पत्र पाठवलं. त्याचा ते २००९ साली 'नवभारत' मासिकानं मुखपृष्ठावर छापलं. त्यात त्यांनी लिहिलं होतं– "ज्या काळात माझ्या लेखनात कोणाला रस नव्हता, तेव्हा तुम्ही त्याचा गंभीर विचार केलात!"

इत्यर्थ – अनेक भल्याभल्या साहित्यिकांच्या मनात विद्यापीठीय (ॲकॅडेमिक) अभ्यासाबद्दल अढी असते, टीकाकारांविषयी ग्रह असतो; तेंडुलकरही अपवाद नव्हते. या बाबतीत त्यांचा पुरता ठाव मला लागलाय; असं मी म्हणणार नाही; यामागे आत गुंतागुंतही असू शकेल!

प्रबंधासाठी कसून अभ्यास करताना, तेंडुलकरांवरील बरेच महत्त्वाचे लेख सापडले, त्यांचं पुस्तक करावं असं मनात येऊन गेलं; पण तत्पूर्वी, तेंडुलकरांचेच जे दहा-बारा नाट्य (चित्रपट) विषयक लेख मिळाले होते, त्यांचं पुस्तक काढावं, असं वाटत होतं, प्रस्तावना मी लिहिणार होतो. याप्रमाणेच, मी तेंडुलकरांच्या दहा-बारा मुलाखतींचं प्रस्तावनेसह संपादन करायचं म्हणत होतो. त्यांच्या प्रकाशकांजवळ तसं बोललोदेखील होतो. प्रकाशकांकडून हे त्यांना कळल्याबरोबर त्यांनी मला कळवलं, "एवढ्यात नको." का? तर, "माझी कालची मतं उद्या असतीलच असं नाही." हे उत्तर! मी पुन्हा विषय काढला नाही.

एकंदरीत, वाहत्या पाण्याला आपल्याला, अडवलं जावं, असं वाटत नसतं, हेच खरं. पुष्कळदा आपण गरज म्हणून ते अडवतो. हे योग्य की अयोग्य? ....मी तेंडुलकरांचे 'काठ फोडून वाहणारं पाणी' अडवलं नाही. हे चूक की बरोबर?

१९७७-७८

मी जुन्या घरातून सध्या राहतो त्या नव्या जागेत - Ph. D ची पदवी घेऊन गृहप्रवेश. लवकरच आमच्या पहिल्या मुलाचीही entry, अल्पावधीतच exit घेण्यासाठी. तेंडुलकरांपर्यत सगळं जात होतं, प्रकाश (रानडे) कडून. त्यांचं मला पत्र–दुःख समजून घेणारं. (प्रभाकर पाध्यांचंही आलं होतं, पण ते दुःखावर मात करण्यातच खरा पुरुषार्थ आहे वगैरे ऐकवणारं.) तेंडुलकर नंतर मला भेटायला खरं सांगायचं तर 'कसा आहे' बघायला माझ्या घरी आले होते, माझा हात हातात घेऊन बसले होते. फार काही बोलले नाहीत – भरल्या डोळ्यांनी बघत होते. एकच वाक्य हळुवारपणे "जीवन असंच असतं - - शांतपणे स्वीकारायचं स्वीकारावं लागतंच!"

तेंडुलकरांचा असाच आणिक एक अनुभव– माझे सासरे कै. श्री. र. कशाळकर हे व्हायोलिनवादक – स्टाफ आर्टिस्ट. अगोदर भालजी पेंढारकरांकडे सिनेमात, नंतर कोल्हापूर सोडून पुण्यात आल्यावर 'आकाशवाणी पुणे' इथं. निवृत्तीनंतर त्यांना कलाकार म्हणून शासनाकडून मानधन मिळू लागलं. ते वाढवून मिळण्याची शक्यता होती. अर्थात कोणाचीतरी शिफारस हवी होती. त्यांनी मला विचारलं, तुमचे तेंडुलकर देतील का? मी तेंडुलकरांकडे शब्द टाकला; त्यांनी ही मोलाची मदत केली. (लहानपणी तेंडुलकरांचाही कोल्हापूरशी जवळचा संबंध होता, त्यामुळेही कदाचित असेल.)

प्रबंधाच्या निमित्तानं तेंडुलकरांचा व माझा सुरू झालेला पत्रव्यवहार बराच काळ चालू राहिला. आज माझ्याजवळ त्यांची ५०-६० पत्रं आहेत – लहान-मोठी, औपचारिक, अनौपचारिक, व्यावहारिक-वैचारिक. 'पटकथां'बद्दल माझ्या प्रश्नांना रेखीव उत्तरं देणारी अन् 'कन्यादान'ला 'सरस्वती सन्मान' मिळाल्यावर आलेली, ही दोन तर उच्च आनंद देणारी आहेत. तेंडुलकरांचं अक्षर तसं किरटंच म्हणावं लागेल; पण त्यांच्या लेखनात/ विचारात किरटेपणा नव्हता. त्यांची अशी पत्रं गोळा करून एकत्र छापली, तर फार मोठं आनंदभांडार खुलं होईल.'ते नावाचे बाबा' या सुषमाच्या पुस्तकातील तिला




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ते. नी लिहिलेली पत्रं ज्यांनी वाचली असतील त्यांना माझं भाकित पटकन पटेल.('झिम्मा'मधले उल्लेख वाचल्यावर मी विजयाबाईंना छापण्याविषयी सुचवलंही होतं.) माझ्या जवळच्या पत्रांतील अत्यंत महत्त्वाची पत्रं माझ्या एका जवळच्या पत्रकारसंपादक मित्रानं (ज्याच्यावर अविश्वास दाखवणं हे पाप ठरलं असतं) 'म. सा. पत्रिके'त प्रसिद्ध करण्यासाठी म्हणून घेतली आणि बिनदिक्कत गहाळ केली, वर 'आता ती मिळणार नाहीत' असंही सांगितलं. अशी आणखी किती पत्रं कुणाकुणाकडून नष्ट केली असतीला! पण राहिलेली असतील. ती तरी वेळेवर छापावीत. 'राहिलं ते गंगाजळ!'

तेंडुलकरांच्या पत्रांप्रमाणेच त्यांनी केलेलं त्यांच्या नाटकाचं वाचनसुद्धा दीर्घकाळ स्मरणात राहावं, असंच असे. माझ्या प्रबंधाचं काम चालू असताना त्यांनी पुण्यात 'पथिक हॉटेल'मध्ये 'भाऊ मुरारराव' व 'पाहिजे जातीचे' या आपल्या दोन नाटकांचं वाचन केलं. मला दोनही वेळा न विसरता मुद्दाम बोलावलं होतं. मीही आवर्जून गेलो होतो. तेव्हा जे ऐकलं ते आता माझ्या वयाच्या अठ्ठ्याहत्तराव्या वर्षी तसं थोडं पुसट झाल्यासारखं वाटतंय, पण त्यातून त्यांचं नाट्यवाचनकौशल्य, सामर्थ्य जे लक्षात आलं, ते फिकट झालेलं नाही.

याबद्दल आज सांगता येईल ते असं–तेंडुलकर गोष्ट सांगण्यासाठी संवाद लिहीत नसत. तसे वाचत ही नसत. त्यांच्या वाचनातून आम्ही शब्दांच्या गर्भितार्था– मागोमाग त्या त्या व्यक्तिरेखेच्या गाभ्यापर्यंत सहज जात होतो आणि तेथून समग्र नाट्यानुभवात एकदम घुसत होतो. शब्दोच्चार, विराम, शब्दफेक, शब्दगती, सगळं असं असे की, प्रयोगासाठीच लिहिणारे (pace) तेंडुलकर प्रयोगाशिवायही लक्ष्यवेध करू शकत, अपेक्षित परिणाम साधत.

त्या काळात इतर काहींची देवरुखकर, माडगुळकर, पुंडलिक वाचनं मी ऐकली होती, ती सगळी आठवता, तेंडुलकरांचं वेगळेपण लक्षात येतं. त्यांच्या वाचनात नाटकीपणा तर नसेच, पण चित्रमयताही नसे. भावुक न होता किंवा प्रखर न बनता, ते नेमका-सोलीव, रसरशीत नाट्यस्पर्श घडवत असे. चाळीस वर्षांपूर्वी ऐकलेल्या वाचनाबाबत जे वाटलं, वाटतंय ते आज याहून अधिक शब्दांत पकडणं, मला तरी अवघड आहे. तेव्हा एवढी झलक पुरे.

'सारेच दीप कसे मंदावले आता!' ही कवी अनिल यांची ओळ अन्वर्थक ठरावी अशी अवस्था आता जवळ येत चालली आहे. 'दिसो लागे काही, तो दिसेनासे होई। कळो लागे काही तो कळेनासे होई।।' अशी गत अधूनमधून होत आहे. पण तरी अजून काही सांगितल्याशिवाय राहवत नाही, मागे बाकी शिल्लक काही राहू नये असं वाटतं, तेव्हा उरलं-सुरलं जसं आठवेल, जसं जमेल, तसं सांगून मोकळा होतो....तर पुन्हा तेंडुलकरपुराण!...

'चेहरे' हा सचित्र (Slidesसह) कार्यक्रम ते स्वतः सादर करीत. त्यात गुन्हेगार/फाशी जाणारे यांचे चेहरे दाखवत. यावेळची त्यांची commentry (टीकाटिपणी म्हणूया) मार्मिक/मर्मभेदी असे. गुन्हेगारांची मनोधारणा, विचारसरणी, फाशी जाणा-यांची मानसिकता यांवर ते जे भाष्य करीत, ते हलवून-हेलावून सोडणारं असे.

पुणे विद्यापीठात लोककलांवर एक चर्चासत्र (seminar) आयोजित केलं होतं, तेव्हा आणि पुण्याच्या फिल्म इन्स्टिट्यूटमध्ये, मणि कौल यांनी 'घाशीराम कोतवाल' नाटकावर तयार केलेला प्रायोगिक चित्रपट बनवला होता, तो दाखवला गेला, तेव्हा, तसंच

S. P. college मध्ये, 'हिंसाचार व घाशीराम कोतवाल' यावर त्यांनी मोठं व्याख्यान दिलं, तेव्हा

तेंडुलकर जे बोलले विशेषतः 'S. P.त' तो त्यांच्या चिंतनशक्तीचा, उत्स्फूर्तपणे विचार वाढवत-फुलवत नेणा-या त्यांच्या अभिव्यक्ती शैलीचा, (ते पट्टीचे, फर्डे वक्ते नसतील कदाचित, पण तरीही त्यांच्या ठायी असणा-या श्रोत्यांना बांधून-खिळवून ठेवणा-या वक्तृत्वाचा) अव्वल दर्जाचा अस्सल नमुना होता, हे मी माझ्या आठवर्णीच्या आधारे आत्मविश्वासानं सांगतोय.

P. D. A च्या संगीत नाटकविषयक ग्रंथासाठी तेंडुलकरांची मुलाखत घ्यायला (कै.) श्रीरंग दामोदर संगोराम (रसिक, दर्दी संगीतज्ञ) व मी स्वतः मुंबईत पार्ल्याला त्यांच्या घरी गेलो होतो, तेव्हाचा प्रसंग. नाटक, संगीत नाटक, मराठीतील संगीत नाटक अशा विषयांवर ते बरंच बोलले–अगदी मोकळेपणानं, स्पष्टपणे. त्यांच्या


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बोलण्यात ताजेपणा होता, वेगळेपणाही होता. ही मुलाखत पुढे प्रकाशित झालेल्या 'वेध' या ग्रंथात समाविष्ट आहे.

ती लक्षात राहिलीय, अजून आठवतीय, ती निराळ्याच कारणासाठी. 'घाशीराम कोतवाल' चा प्रयोग चांगला होतो, प्रभाव पाडतो, लोकांना आवडतो, हे त्यांना मान्य होतं; पण त्यांना अभिप्रेत असलेला 'घाशीराम...' त्यातून थेट पोचत नाही, म्हणून ते खूप नाराज होते... एका मोरोक्कन नटाच्या प्रयोगात त्यांना हवा तो थरारक परिणाम होता, असंही ते म्हणाले. (त्यांच्या पुस्तकातील एका लेखात त्यांनी ते मांडलंही आहे.) मला तरी ते म्हणणं धक्का देणारं, पण अधिक विचार करायला लावणारं वाटलं, अजूनही वाटतंय. (प्रत्यक्ष रंगकर्मींना काय वाटलं/वाटतंय?)

तेंडुलकर पार्ल्यातून अंधेरीत राहायला आले, तेव्हाची गोष्ट. एक दिवस मला पुण्यात माझ्या घरी त्यांचा फोन आला

"सध्या तुझं काय चाललंय?"– ते.

"विशेष काही नाही. घरचे व्यापताप सांभाळतोय. तुम्ही कसे आहात? काही लिहिताय?"– मी.

"वयाबरोबर येतं ते आलंय, पण 'भाभा'साठी एक 'प्रोजेक्ट' करायचा म्हणतोय."– ते.

"म्हणजे नेमकं काय करणार आहात?"– मी.

"मुंबईला येशील का? समक्ष बोलू. तुझी मदत हवीय." ते.

"येईन, माझी आतेबहीण अंधेरीतच राहते, त्यामुळे अवघड काहीच नाही." मी.

हे ऐकल्यावर त्यांना विलक्षण आनंद झाला, त्यांचा तो उत्साही आवाज ऐकून मी कमालीचा गहिवरलो.

पण त्यांच्या आजारामुळे, माझ्या अडचणींमुळे, तो योग आला नाही.

(पु. लं.नाही मला घेऊन असंच काही करायचं होतं; पण तोही योग नव्हता.)

नियती!

अखेर भेट 'प्रयाग हॉस्पिटल' मध्ये (पुण्यात).

पहिल्यांदा गेलो, ते बोलू शकत नव्हते. पण त्यांच्या हातातून अन् डोळ्यांतून मला समजत होतं, त्यांना काय म्हणायचंय.

माझा मुलगा बरोबर होता, त्याला ते पहिल्यांदाच पाहत होते. पाहून सुखावले. दुस-यांदा, शेवटचा, भेटलो, ते जाण्याआधी आठ-दहा दिवस. त्यांना बोलायचं होतं, तेवढ्यात त्यांचा सेवकसखा त्यांना 'म. टा.' द्यायला आला, ते संतापून ओरडले- "टाइम्स हवाऽय, इंग्रजीऽऽ." त्यांनी राग आवरला, पण त्यांचा बोलण्याचा मूड गेला.

मी व मुलगा, दोघेही त्यांचा मूक निरोप घेऊन बाहेर....

तेंडुलकर गेल्यावर त्यांच्या धाकट्या मुलीकडून (सौ. तनुजा मोहिते) त्यांचं बहुविध अप्रकाशित लेखन त्यांच्याच अक्षरातलं मिळालंय. त्याचा मागोवा कधीतरी घ्यावा असं मनात आहे. ते चाळताना मनात येतं, ही त्यांची-आपली 'अक्षर'भेट! असो, आता आख्यान आवरतं घ्यावं, हे बरं....

प्रत्यक्ष आठवणी (म्हणजे माझ्या आठवणी) सांगून झाल्या, अप्रत्यक्ष (म्हणजे माझ्या नसलेल्या) सांगून लांबण लावण्यात काही हशील नाही, सांगितल्या त्यांत सर्वच कालक्रम सांभाळता येणं अवघड होतं, त्यांतून मला दिसलेले, भेटलेले, समजलेले तेंडुलकर स्पष्ट व्हावेत, या दृष्टीनं काही ठिकाणी मी ते वाचकांवर सोपवलंय. तुकड्या-तुकड्यांतून तेंडुलकरांचं सलग चित्र ब-यापैकी उभं राहील, अशी आशा आहे.

कुणी नाकही मुरडेल! मुरडो!

मला माझ्या आठवणींच्या आरशात तेंडुलकरांचं प्रतिबिंब दाखवायचं होतं, माझ्या परीनं मी दाखवलंय.

याची गरज होती का?...हो!

'घन ओथंबून येतात, बरसतात.'

माझ्या आठवणी ओथंबून आल्या, बरसल्या.

***

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# शिकणे म्हणजे तत्काल, सरळ, प्रत्यक्ष दर्शन घडणे!

कमलेश सोमण

'खरे शिक्षण हे कितीतरी सखोल व विशाल असते. जीवनाचे आकलन करून घेण्याची क्रिया ही अगदी बालपणापासून सुरू झाली पाहिजे.'

शिकण्याला तर अंतच नसतो.

मुख्य म्हणजे तुम्ही कशापासूनही शिकू शकता! केवळ लिहिणे, वाचणे वा परीक्षा उत्तीर्ण होणे म्हणजे शिक्षण नव्हे.

शिक्षण हे क्षणाक्षणाला घडत असते. शिकण्याची ही संपूर्ण प्रक्रिया म्हणजे ध्यानात घडून येणारा स्फोटच असतो.

शिकणे म्हणजे तत्काल, सरळ, प्रत्यक्ष दर्शन घडणे.

**जे. कृष्णमूर्ती**

एक दिवस एक शिक्षक जे. कृष्णमूर्तींना भेटायला आला. त्याने संवादात जे. के. यांना विचारले की, शिक्षणाचे खरे कार्य, खरा धर्म कोणता? तेव्हा त्या दोघांच्या झालेल्या संवादातच नव्हे, तर जे. कृष्णमूर्तींच्या व्याख्यानातून, मुलाखतीतून त्यांचे शिक्षणविषयक विचार व्यक्त होताना आपल्याला दिसतात. ते खरोखरीच अभ्यासण्यासारखे आहेत. त्यांतील काही सूत्रे पुढीलप्रमाणे आहेत :

१. आपल्या जीवनातील प्रत्येक कृत्यामागच्या मनोव्यापाराचे स्वरूप समजून घेण्यास मदत करणे हे शिक्षणाचे कार्य आहे. यामुळेच मूलभूत असे परिवर्तन शक्य होईल. आपल्या मनाच्या स्वरूपाचे सूक्ष्म अवलोकन करणे, जीवनाच्या कुठल्याही एका अंगाला अवास्तव महत्त्व न देता जीवनाचे समग्र दर्शन घडवणे, तसेच मी आणि माझे, या द्वंद्वाच्या पलीकडे नेणे, हे शिक्षणाचे मूलभूत कार्य आहे.

२. व्यक्तीच्या मनात सुसंवाद कसा निर्माण करता येईल, ही शिक्षणापुढील मुख्य समस्या आहे.

३. व्यक्तीच्या मनात मूलभूत परिवर्तन घडून येण्यापासून शिक्षणाला प्रारंभ होतो. धर्म-पंथ वा कसलेही कारण असो, यासाठी संघर्ष करणे चुकीचे आहे, ही जाणीव शिक्षणाने निर्माण केली पाहिजे.

४. ज्यामुळे प्रज्ञा जागृत होते, मनातील गोंधळ संपून सुसंवाद निर्माण होतो, तेच खरे शिक्षण. अशा त-हेने शिक्षणच ख-या अर्थाने नवी संस्कृती, नवे जग निर्माण करू शकेल.

५. मुक्त व निर्भय मनाच्या व्यक्ती निर्माण करणे, हा ख-या शिक्षणाचा हेतू आहे. अशा व्यक्तीच समाजजीवनात सहकार्य आणि सुसंवाद निर्माण करू शकतील. खरे शिक्षण आपल्या जिव्हाळ्याचा विषय कोणता आहे, हे शोधून काढण्यास विद्यार्थ्यास साहाय्यभूत ठरते.

६. नवी संस्कृती, नवा माणूस निर्माण करण्यात शिक्षणाचे अनन्यसाधारण महत्त्व आहे. खरेतर शाळा असे ठिकाण आहे की, समग्र जीवनासंबंधी तिथे शिकता येते. संपूर्ण मानव घडवणारी जीवनरीत या शाळांमध्ये सर्वकाळ टिकली पाहिजे.

७. ख-या अर्थाने सुसंस्कृत आणि शांततामय अशी समाजरचना निर्माण करण्याची जबाबदारी शिक्षकावरच आहे. हे सामाजिक परिवर्तन घडवून आणण्याची फार मोठी संधी शिक्षकाला लाभलेली आहे.

८. प्रत्येक विद्यार्थी ही अनन्यसाधारण अशी व्यक्ती असते. म्हणून तिची कुणाशीही तुलना करणे योग्य नसते. या दृष्टीने जेव्हा शिक्षक विद्यार्थ्याकडे पाहू लागेल, तेव्हा कुठल्याही विशिष्ट पद्धतीची किंवा व्यवस्थेची त्याला गरजच उरणार नाही. यानंतर विद्यार्थ्याला संस्कारबद्ध करीत राहणारे जे बाह्य व आंतरिक प्रभाव असतात, त्यांच्या स्वरूपाचे आकलन करून घेण्यास त्याला मदत करणे, एवढेच शिक्षकाचे कार्य राहील. विद्यार्थ्याला एकदा असे आकलन झाले, की त्यापुढील गुंतागुंतीच्या जीवनाचा सामना तो सुज्ञतेने व निर्भयपणाने करू शकेल; आणि संपूर्ण जीवनात आज गोंधळ माजलेला आहे, त्यात आणखी नव्या गोंधळाची भर तो घालणार

अनुक्रमणिका

नाही.

९. खरा कलावंत एकवेळ उपाशी राहील, पण आपले कलानिर्मितीचे कार्य सोडणार नाही. ख-या शिक्षकाचे असेच असते. शिकवणे हे त्याच्या बाबतीत तंत्र नसून ती त्याच्या जीवनाची रीत असते. शिक्षणाविषयीची अशात-हेची ज्योत जोपर्यंत अंतकरणात पेटत नाही, तोपर्यंत शिक्षणाच्या क्षेत्रात कुणी पडू नये, हेच उत्तम. आपल्या अंतःप्रेरणेचा अपरिहार्य आविष्कार म्हणून आपण शिक्षणाकडे बघतो का, की उपजीविकेचे साधन एवढाच आपला दृष्टिकोण आहे, याची शिक्षकांनी खात्री करून घेतली पाहिजे.

१०. तुम्ही स्वतःच शिक्षणाचा श्रीगणेशा केला पाहिजे आणि मोठे झाल्यावर आपल्या मुलांनाही योग्य प्रकारचे शिक्षण देण्याची व्यवस्था तुम्हीच केली पाहिजे. एक लक्षात घ्या की, खरे शिक्षण हे कितीतरी अधिक सखोल व विशाल असते. खरे शिक्षण म्हणजे काय, तर मनाचे अशा रीतीने संवर्धन करायचे की, या मनाकडून होणारी कृती ही अहंकेंद्रित राहू नये. आपले मन नेहमीच सुरक्षिततेची मागणी करीत असते आणि आपणही या सुरक्षिततेच्या जाळ्यात अडकत जातो. वस्तुतः सारेच असुरक्षित असते, हे लक्षात घ्यायला हवे. खरे शिक्षण मिळविण्यासाठी तुम्हाला आपला अभ्यासही तत्परतेने केला पाहिजे आणि आळसाला मुळीच थारा देता कामा नये. तसेच निरनिराळ्या खेळांमध्ये तुम्ही प्रावीण्य मिळवले पाहिजे. अर्थात हे प्रावीण्य हे प्रतिस्पर्ध्यावर मात करण्यासाठी नव्हे, तर त्या खेळातील आनंद लुटण्यासाठी मिळवायचे असते. योग्य असेच अन्न खा व शरीर सुदृढ ठेवा. तुमचे मनही सतत सावधान व तत्पर असे असू द्या. असे मन जीवनातील समस्या सोडविण्यास समर्थ होईल. योग्य शिक्षण मिळविण्यासाठी तुम्हाला स्वतःचे ज्ञान असले पाहिजे व ते अखंडपणे करून घेत राहिले पाहिजे. शिकणे जेव्हा तुम्ही थांबवता, तेव्हा जीवन असुंदर व असुखी बनते. तुमच्यात जर चांगुलपणा व प्रेम यांचे बीजारोपण झालेले नसेल, तर तुम्हाला योग्य शिक्षण मिळाले, असे कधीच म्हणता येणार नाही.

११. स्वतः शिकणे आणि दुस-याकडून शिकविले जाणे या दोहोंत फार मोठे अंतर आहे. स्वतः शिकणे हे जन्मभर चालू असते, तर दुस-याकडून शिकविले जाणे हे काही तासांत किंवा काही वर्षांतच संपून जाते आणि मग उरलेल्या आयुष्यात या शिकलेल्या गोष्टींची पुनरावृत्तीच काय ती तुम्ही करीत राहता. जे तुम्हाला शिकवले गेलेले असते, त्याची नुसती राख बनून जात असते आणि जीवन हे तर चैतन्यमय व सळसळणारे असल्यामुळे, ते केवळ अर्थशून्य अशा प्रयत्नांची रणभूमी बनून जाते. जीवनाचे आकलन करून घेण्याची सवड तुम्हांला न देता, व त्यासाठी आवश्यक ती क्षमता तुमच्यामध्ये न आणताच तुम्हाला एकदम जीवनात ढकलून दिले जात असते. जीवन म्हणजे काय, हे कळण्यापूर्वी तुमचे लग्न होते, व्यवसाय-धंद्याच्या खुंट्याला तुम्ही बांधले जाता आणि तिकडे समाज तुमच्याकडे चोहोबाजूंनी मागण्यांचा निर्दय मारा करीत राहतो. वस्तुतः जीवनाचे आकलन करून घेण्याची क्रिया, ही अगदी बालपणापासून सुरू झाली पाहिजे. अखेरच्या घटकेला नव्हे; प्रौढ झाल्यानंतर किंवा शिकण्याची वेळ निघून गेल्यानंतरही नव्हे.

१२. शिकण्याचे स्वातंत्र्य असणे, ही सर्वस्वी वेगळी बाब असते. अनेकदा आपला दृष्टिकोण हा ज्ञानावर किंवा अनुभवांवर आधारलेला असतो. आपण अगोदरच काहीतरी गृहीत धरतो, काही निष्कर्ष काढून ठेवतो. आपण आपल्या निष्ठेला वा परंपरेला पक्के बांधून घेतलेले असते. एकूणच, जेव्हा आपल्याला एखादे उद्दिष्ट गाठायचे असते, तेव्हा शिकण्याचे स्वातंत्र्य उरतच नाही.

सारांश, जे जे शिकविले गेलेले आहे, त्यातच अडकले गेलेले आंधळे मन हे मात्र शिकण्यास असमर्थ असते. त्यामुळे नवे काही शिकायचे असेल, तर ज्ञानाचा संग्रह करता कामा नये, भूतकाळातील अनुभव गोळा करता उपयोगी नाही. हे वास्तव, ही वस्तुस्थिती आपण प्रथम जाणून घेतली पाहिजे. अखेरीस शिकणे, हा एक व्यापार आहे आणि जोवर आपले मन हे सुरक्षितता, सुखसोई व शांततेच्या अभिलाषेने बद्ध होऊन गेलेले असते, तोवर नव्या शिकण्याचा व्यापार सुरूच होणार नाही, आणि नवे काही शिकण्यास समर्थ होण्याचे महत्त्व आणि त्याबद्दलची उत्कट तळमळ ही मनाला निष्कर्षापासून, शब्द व स्मृती यांनी निर्माण केलेल्या









राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अहंपासून मुक्त करील. शिकणे ही काही माहिती वा तपशील गोळा करीत राहण्याची प्रक्रिया नाही. शिकणे हे क्षणाक्षणाला घडत असते. शिकण्याची ही संपूर्ण प्रक्रिया म्हणजे ध्यानात घडून येणारा स्फोटच असतो. शिकणे म्हणजे तत्काल, सरळ, प्रत्यक्ष दर्शन घडणे.

आत्तापर्यंत आपण जे. कृष्णमूर्तींच्या शिक्षणाविषयी जी काही थोडीफार सूत्रे पाहिली, त्यावरून शिक्षणाचा ते किती साकल्याने सर्वांगीण विचार करतात, हे आपल्या लक्षात येईल. एकदा एका मुलाखतीत मुलाखतकाराने त्यांना विचारले की, जीवन म्हणजे काय? तेव्हा त्यांनी दिलेले उत्तर तुम्हा-आम्हा सर्वांनाच अंतर्मुख करणारे आहे. जे. कृष्णमूर्ती म्हणतात की, 'जन्माच्या क्षणापासून मृत्यूच्या क्षणापर्यंत किंवा कदाचित पुढेही जीवन पसरलेले असते. जीवन ही अतिशय विशाल, संकुल, संपूर्ण व एकरसात्मक अशी वस्तू आहे. एकाच क्षणी जिथे विविध घटना घडत राहतात, अशा घरासारखे हे जीवन असते. तेथे तुम्ही प्रेमही करता व द्वेषही करता. लोभही धरता व मत्सरही करता. आणि त्याच क्षणी आपले वाटणे बरोबर आहे, असेही तुम्हाला वाटत असते. तुम्हाला कसलीतरी महत्त्वाकांक्षा असते आणि तिची पूर्ती करण्याच्या प्रक्रियेत चिंता, भीती व निष्ठुरता उत्पन्न होत राहते. आणि यातून कधी विफलता तर कधी सफलता पदरी येते. आणि काही काळाने या सगळ्या गोष्टींबद्दलची व्यर्थता जाणवू लागते. याशिवाय जीवनामध्ये युद्धाची पशुता व भयानकता जशी असते, तशीच भीतीमुळे निर्माण होणारी भयाण शांतीही असते. तेथे राष्ट्रवाद व सर्वाधिकारवादही असतो आणि तो युद्धाला बळ मिळवून देत असतो. आणि या जीवनमार्गाच्या शेवटी मृत्यू असतो. किंवा कधीकधी तो मध्येच येऊन गाठतो. जीवनात ईश्वराचा शोधही चालू असतो. परस्परविरोधी श्रद्धा व संघटित धर्म यांच्यामधील भांडणेही तेथे चालू असतात. याशिवाय एखादी नोकरी किंवा एखादा व्यवसाय प्राप्त करून घेण्याची आणि टिकविण्याची धडपडही चालू असते. लग्न, मुले, आजार हेही त्यात असतात. समाज व सरकार यांचीही सत्ता चालू असते. हे सर्व आणि आणखीही कितीतरी असे मिळून जीवन बनलेले असते आणि अशा विलक्षण गोंधळात तुम्ही फेकले जात असता. सामान्यतः माणसे ही जीवनाच्या तळात बुडून जातात. दुःखी होतात. किंकर्तव्यमूढ होऊन जातात आणि या अशा जीवनाच्या माथ्यावर जरी तुम्ही चढून बसलात, तरीही तुम्ही या गोंधळाचा, या संभ्रान्ततेचा एक भाग असता. अशा या प्रकाराला आपण जीवन असे म्हणतो. तेथे अविरत धडपड व दुःख हीच काय ती नांदतात. मधूनमधून आनंदाचे क्षण येतील तेवढाच काय तो विरंगुळा. या सगळ्या गोष्टींबद्दल तुम्हाला कोण शिकवणार आहे? किंवा या गोष्टींचे आकलन तुम्ही कसे करून घेणार आहात? तुमच्यामध्ये बुद्धी, कौशल्य व क्षमता असली तरी महत्त्वाकांक्षेने तुम्ही घेरले जाता. यशाच्या कामनेने तुम्ही पछाडले जाता. मग विफलता व दुःख यांचे भक्ष्य बनता. हे सगळे म्हणजेच जीवन. होय ही नाही? आणि त्याच्यापलीकडे जाणे हेही जीवनच होय!

***



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# गरट्रुड बेल

विश्वास दांडेकर

पॅरिस (फ्रेंच उच्चार 'पारी') या फ्रान्सच्या राजधानीत दि. १३/११/१५ ला जो दहशतवादी हल्ला झाला, त्यामुळे सर्व जग हतबद्ध झाले. दीडशेच्या आसपास हसती-खेळती माणसे क्षणात किडा-मुंगीप्रमाणे चिरडली गेली याची चीड, आणि या भडकलेल्या आगीला आवरायचे कसे याची चिंता अशा मनःस्थितीत नेते व सामान्य जनता आजही आहे. या घटनेवर तात्काल प्रतिक्रिया देताना काही नेत्यांनी उतावळेपणा करत आपल्याला वाटणारी कारणमीमांसाही जोडली. या घटनेचा निखळ निषेध करणे, निरपराध्यांच्या सामूहिक हत्याकांडावर–त्या मानसिकतेवर-आसूड ओढणे इथे थांबायला हवे होते. असे का घडले, उपाययोजना काय यावर चर्चा पुढे होणारच. त्या वेळी कारणमीमांसेत शिरणे योग्य ठरले असते. काहीही इतिहासात असले तरीही हा वा असा हल्ला समर्थनीय ठरवता येत नाही हे भान कसे सुटले, हा प्रश्नच आहे. प्रत्येक गोष्ट मतपेटीकडे नजर रोखून पाहण्याची ही सवय भारतातल्या अनेक तथाकथित नेत्यांना जडली आहे. मात्र जिथे हा काळा दिवस उजाडला होता, त्या फ्रान्समधील प्रतिक्रिया नागरी समाज कशाला म्हणतात याचे एक अनुकरणीय उदाहरण म्हणून लक्षात राहील. असो.

भारतात होणारे दहशतवादी हल्ले (अक्षरधाम, संसद भवन, २६/११ मुंबई ही काही ठळक उदाहरणे) हे पाकिस्तानप्रणीत आहेत हे गुपित नाही. अशा हल्ल्यांना भारतातून काही मदत मिळाल्याशिवाय हल्ले यशस्वी होणार नाहीत, हेही स्पष्ट आहे. माध्यम चर्चांमध्ये 'धर्म' या गोष्टीची तत्त्वे ही इहपरलोकी सर्वांचे भले व्हावे अशी असल्याने दहशतवाद व धर्म यांची सांगड घालू नये,असा धागा नेहमी असतो. धर्माच्या पुस्तकांमध्ये असलेला धर्म, त्याप्रमाणे आचरण हा स्वतंत्र विषय. शेवटी व्यवहारात अनुयायी आचरतात तोच धर्म, ही वस्तुस्थिती असते. हे अनुयायांचे आचरणार अनेक बाबींवरून ठरते. यात 'अर्थ एव प्रधानः' हे कौटिली अर्थशास्त्रात नोंदलेले तत्त्व एक प्रमुख कारण आहे.

भारतात घडवली जाणारी दहशतवादी कृत्ये ही प्रामुख्याने पाकिस्तानी भूमीतून उगवत जोपासलेली असली, तरी भारतीय उपखंड सोडता आज पश्चिम आशिया हे दहशतवादाचे एक मोठे केंद्र आहे. संपूर्ण अरब प्रदेश या पश्चिम आशियाचा भाग आहे. आज हा सर्व प्रदेश अस्थिर, अनेक भागांत निर्नायकी, रोज बॉंबस्फोटांना तोंड देणारा पश्चिमेला अल्जिरिया ते पूर्वेला तुर्कस्तान, सोबत इराक-ईजिप्त-सिरिया, लिबिया.... खूप मोठा भाग यात मोडतो. पॅरिस, लंडन वगैरे ठिकाणी जे प्रकार घडवले जातात, त्याचे उगमस्थान हा भूप्रदेश आजतरी आहे. या प्रदेशातल्या काही भागात 'इसीस' म्हणजे मूलतत्त्ववादी इस्लामिक संघटना या अलीकडे उदयाला आलेल्या अनुयायांचे प्राबल्य आहे. याआधी कार्यरत असलेली अलकायदा हीचा उगमही अरबस्तानातच होता.

हे असे का घडले, याची समग्र चर्चा इथे अभिप्रेत नाही. ते शक्यही नाही. मात्र यातला एक धागा याविषयीच्या लिखाणात चर्चेत, मांडणीत खूपच दुर्लक्षित आहे. ऐतिहासिक विश्लेषणात त्याला एक स्थान आहे. आज इतिहासाचे काटे मागे फिरवता येणार नाहीत, हे खरेच आहे. मात्र यामागचे तत्त्व जर अनुसरले गेले, तर भविष्यात इतरत्र अशा घोडचुका टाळता येतील.

हे ऐतिहासिक प्रकरण पहिल्या महायुद्धात (१९१४-१९१८) व त्याच्या आधी व नंतरचा काळ असे पसरलेले आहे. याच्या केंद्रस्थानी एक आश्चर्यजनक व्यक्तिमत्त्व असलेली स्त्री आहे. ब्रिटनची नागरिक. तिचे नाव गरट्रुड बेल. यापुढच्या लिखाणात तिचा उल्लेख सोयीसाठी फक्त

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'बेल' असा केला आहे.

ऑक्सफर्ड विद्यापीठातून आधुनिक (तत्कालीन काळ पहिल्या महायुद्धाआधीचा) इतिहास शाखेत तिने पहिला क्रमांक मिळवत पदवी प्राप्त केली. असा सन्मान जिंकणारी विद्यापीठाच्या इतिहासातली पहिली महिला. अरेबिक, पर्शियन, तुर्की व हिब्रु या भाषांवर तिचे प्रभुत्व होते. या प्रदेशातल्या स्थानिक बोलीभाषा तिला उत्तमपणे बोलता येत. अरब प्रदेशावर तिचा जीव होता. या वेळ पावेतो (विसाव्या शतकाची सुरुवात) या अरब भूमीचा एक उत्तम नकाशाही पाश्चात्त्य देशांकडे नव्हता. या अरबभूमीत बेलने जवळपास २५,००० मैलांचा प्रवास केला. (४०,००० किलोमीटर.) काही पायी पण बराचसा उंटावरून. सातशेहून थोडे जास्तच दिवस तिने उंटावर काढले. प्रशिक्षित इतिहासतज्ज्ञ, त्या भूमीवर प्रेम, भाषा अवगत यामुळे अरब प्रदेशाचे तिचे ज्ञान हे एका विश्वकोशाच्या तोडीचे होते. अरब टोळीप्रमुखांशी ओळख, राबता असला तरी ती आपला बहुतेक वेळ त्या टोळयांमधल्या सामान्य अरब स्त्री-पुरुषांसोबत राही. त्यांचे उंट, शेळयामेंढ्या आजूबाजूला असत. सामान्य अरब व टोळीप्रमुख म्हणजे 'शेख' यांना तिच्याबद्दल आदर-जिव्हाळा होता.

त्या वेळी हा सर्व प्रदेश ऑटोमन तुर्कांच्या साम्राज्याचा भाग होता. तुर्कांनी (मध्य आशियातील जमाती-भारतात आलेले बाबर वगैरे तुर्कच होते. आपल्या इतिहासात त्यांना मुघल) संबोधले जाते. मराठीत उच्चारबदल होत मोगल. इस्तंबूल म्हणजे कॉन्स्टॅंटिनोपल जिंकले आणि बाल्कन प्रदेशातल्या काही भागासमवेत उत्तर आफ्रिका -अरेबिया इथला खूप मोठा प्रदेश जिंकत-व्यापत त्यांनी आपले साम्राज्य उभारले, जे काही शतके, टिकले. या साम्राज्याला ऑटोमन साम्राज्य असे संबोधले जाते.

हे ऑटोमन तुर्क आता टोळीधर्म सोडून इस्लामचे अनुयायी झाले होते. अरब प्रदेश तर इस्लामचे जन्मस्थान. इस्लाममध्ये शिया-सुन्नी असे पंथ आहेत. त्यांचे एकमेकांसोबत संबंध नेहमीच ताणलेले असून आजही तेच चित्र आहे. इराण सुन्नी नव्हे तर शिया, तसेच इराण अरबही नाही. साहजिकच शियांचे नेतृत्व इराणकडे गेले. सुन्नी जगतामध्ये 'खलिफा' अशी संस्था होती. संपूर्ण सुन्नी जगाचा 'सम्राट'म्हणजे खलिफा. या खलिफांची स्थाने, कुळ हे बदलते राहिले. बलवान असेल तो खलिफा. सुन्नी इस्लामच्या ताब्यात असलेल्या अनेक प्रदेशांत या खलिफाचा राजकीय प्रभाव शून्य असला तरी सुन्नी विश्वात आपल्या राजवटीला खलिफाचा आशीर्वाद आवश्यक वाटे, तो धार्मिक-भावनिक कारणांमुळे. भारतात मुघल सम्राट औरंगजेब याने स्वतःच्या राजवटीला खलिफाचा (इस्तबूल-ऑटोमन सम्राट) आशीर्वाद मिळवला होता. सर्व सुन्नी जगताचा प्रमुख असा तो धार्मिक धागा.

हे तुर्कांचे साम्राज्य मोठे प्रबळ होते. भूमध्य समुद्र व काळा समुद्र (याच्या किना-यावर युक्रेन आहे.) यांना जोडणारा अरुंद समुद्रपट्टा तुर्कांच्या ताब्यात होता.जमीनमार्गाने हिंदी महासागराशी संबंध जोडणा-या मोठ्या महत्त्वाकांक्षी योजनेतून बर्लिन ते बगदाद अशी रेल्वे उभारण्याची जर्मन महत्त्वाकांक्षा प्रत्यक्षात येत होती. जर्मनी एक मोठी शक्ती म्हणून पुढे येत असल्याने ब्रिटन विरुद्ध जर्मनी हा झगडा केव्हातरी मैदानी व समुद्री युद्धात रूपांतरित होणार, हे साधारण १९०० इ.स. पासून जाणवत होते. ब्रिटिश राज्यकर्ते, नौदल-भूदल वरिष्ठ अधिकारी यांना एक यक्षप्रश्न सतावत होता. या संभाव्य युद्धात ऑटोमन साम्राज्याचे धुरिण जर्मनीच्या बाजूने युद्धात उतरणार का? जर तसे झाले तर मध्यपूर्वेतल्या ब्रिटिश हितसंबंधांना कुठल्या स्वरूपाचा धोका संभवतो? अशा युद्धात अरब टोळ्या काय करतील?

बेल यांच्या अरब प्रदेशाच्या सखोल ज्ञानामुळे ब्रिटिश परराष्ट्र खात्याने तिची नेमणूक आपल्या हेरव्यवस्थेत केली. तिच्यासोबत मध्यपूर्वेची थोडीफार ओळख असलेली मंडळी घेत ईजिप्तच्या 'काहिरा' (भारतात कैरो) या राजधानीत एक 'अरब ब्यूरो' नामक संस्था स्थापण्यात आली. ही संस्था ब्रिटिश हेरव्यवस्थेचा भाग होती. संपूर्ण मध्यपूर्वेतून तुर्कस्थानी साम्राज्यासंबंधी मिळेल ती माहिती गोळा करणे, विश्लेषण, निष्कर्ष असे यामागचे हेतू. आता या अरब ब्यूरोमधली अती महत्त्वाची व्यक्ती बेल होती. मागची कित्येक वर्षे जे संबंध तिने बांधले होते, ते आता फळ देणार होते.

मध्यपूर्वेत ऑटोमन तुर्कांचे तळ, रसदपुरवठा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व्यवस्था, वाहतूकयंत्रणा, शस्त्रसाठा यांची खडान् खडा माहिती या स्त्रीला सतत मिळत होती. पॅलेस्टाईनमधल्या एका ज्यू हेरजाळ्यासोबतही तिचे धागेदोरे होते. 'अरब' मंडळींची संभाव्य युद्धातील भूमिका याचे ज्ञान तर तिला होतेच, पण सोबत या युद्धात ब्रिटनच्या बाजूने या अरबांचा काय उपयोग करुन घेता येईल, याच्या काही योजना-आराखडे याचा बारकाईने विचार तिने केला होता.

आपले संपर्क, पार्श्वभूमीतली माहिती या आधारे बेल हिने ऑटोमन तुर्क युद्धात जर्मनीच्या बाजूने भाग घेणार, असा ठाम अंदाज वर्तवला. सोबत संपूर्ण मध्यपूर्व, त्यातले अरब हे ऑटोमन तुर्कांच्या राजवटीला फक्त कंटाळलेले नव्हे तर या राजवटीविरुद्ध उठावात भाग घेण्याच्या मानसिकतेत आहेत हे ब्रिटनच्या सेनाधिका-यांच्या नजरेस आणून दिले. प्रत्यक्ष युद्ध पेटण्याआधी बेल यांना ब्रिटिश सैन्यात 'मेजर' असे पद देण्यात आले.

या मध्यपूर्वेत ब्रिटिशांना सगळ्यात जास्त चिंता होती ती सुएझ कालव्याची. आशिया-आफ्रिकेत पसरलेल्या साम्राज्यांची सुएझ ही जीवनवाहिनी होती. जर हा कालवा हातातून गेला, तर साम्राज्यावर पाणी सोडण्याची वेळ येऊ शकत होती. बेल यांनी गोळा केलेल्या माहितीआधारे तुर्क हे सुएझवर ताबा मिळवण्याचा प्रयत्न युद्धाच्या एका टप्प्यावर करतील, हे अंदाजता येत होते. सोबत मध्यपूर्वेत तुर्कांचे सेनादल, संख्या व शस्त्रप्रणाली अशा दोन्ही क्षेत्रांत फार मजबूतीचे नाही, हेही उघड होत होते.

जरी गरज म्हणून बेल यांना लष्करात 'मेजर' पदावर कमिशन्ड अधिकारी म्हणून पद दिले असले, तरी मध्यपूर्वेतल्या ब्रिटिश वरिष्ठ अधिका-यांचे व बेल यांचे सूत जुळत नव्हते. याला कारण होते ते बेल यांचा एक आग्रही मुद्दा. अरबांना या युद्धात सामील करून घ्यावे असा त्यांचा हट्ट होता. याला तिथले वरिष्ठ सेनाधिकारी ठाम नकार देत होते. अरबांना ऑटोमन तुर्कांच्या साम्राज्याची, त्यांच्यावर होत असलेल्या अन्यायाची चीड आहे आणि हे साम्राज्य उलथवून स्वतंत्र होण्यासाठी युद्धात भाग घ्यायला अरब उत्सुक आहेत हे ठीक, मात्र ब्रिटीश सेनेसोबत युद्धांत? शक्य नाही. कारण? कारण वंशवाद. आम्ही ब्रिटिश श्रेष्ठ, आमचा वंश श्रेष्ठ. हे गलिच्छ, मूर्ख, रानटी अरब काय लढणार? स्थानिक वरिष्ठ ब्रिटिश सेनाधिका-यांचा ठाम नकार बेल यांनी सहजी स्वीकारला नाही. त्यांनी लंडनस्थित सर्वोच्च सेनामुख्यालयात पोचत आपली योजना तिथे सविस्तर मांडली. ही योजना त्या वर्तुळात स्वीकारली गेली. अरबांना बेल म्हणत आहेत त्या पद्धतीने सामील करून घेण्याचे आदेश मध्यपूर्वेतल्या सेनाधिका-यांना देण्यात आले.

याचा अर्थ अरबांबद्दल घृणा-तुच्छता-वंशश्रेष्ठत्व या भावना लंडन इथे नव्हत्या, असे नव्हे. अशा प्रकारे सहभाग स्वीकारल्याचे उदाहरण ब्रिटनच्याच स्वतःच्या इतिहासात होते, तेही फार पूर्वी नव्हे. बेल यांच्या इतिहास-व्यासंगातून त्यांनी हे उदाहरण समोर ठेवले.

नेपोलियन बोनापार्ट विरुद्ध युरोप या व्यापक युद्धात एक टप्पा इबेरिया (आजचा स्पेन पोर्तुगाल) इथला आहे. फ्रेंच प्रशिक्षित सेनादलांविरूद्ध फौजा लढत असताना गनिमी कावाही वापरावा, त्यासाठी स्पेनच्या सामान्य शेतक-यांची मदत घ्यावी, असा विचार पुढे आला. स्थानिक वरिष्ठ सेनाधिका-यांचा नकार. कारण तेच. हे अशिक्षित, मूर्ख शेतकरी नेपोलियनच्या जगप्रसिद्ध 'ग्रँड आर्मी' शी लढणार? मात्र त्या वेळी नेपोलियनविरुद्धच्या मोहिमेचे सर्वोच्च सेनापती होते ड्यूक ऑफ वेलिंग्टन. मूळ नाव ऑर्थर वेलस्ली. भारतात अनेक युद्धांत वावरलेले. वॉटरलूच्या लढाईत यांच्या नेतृत्वाखालीच नेपोलियनचा निर्णायक पराभव झाला. हा वाद त्यांच्यापर्यंत पोचला. त्यांनी ताबडतोब संमती दिली व खेडोपाडीच्या स्पॅनिश शेतक-यांची मदत घेतली गेली.

अशी मदत या मंडळींना प्रशिक्षित करून नियमित सैन्यात भरती अशा स्वरूपाची नव्हे. सैन्य प्रशिक्षित करणे, आधुनिक शस्त्रप्रणाली आत्मसात होणे हा वेळ मागणारा प्रकार. मदत घेण्यात येणार गनिमी कावा. अर्थात 'गुरिला' युद्धप्रकारातून.

अरबांना बंदुका, दारूगोळा पुरवायचा. ज्या वेळी ब्रिटिश-फ्रेंच सैन्यतुकड्या मध्यपूर्वेत. ऑटोमन तुर्कांविरूद्ध रण सुरू करतील त्या वेळी . म्हणजे तुर्की सैन्याच्या पिछाडीला रसद तोडणे-लुटणे, पूल-रेल्वे नष्ट करणे, तुर्कांची वाहतूकव्यवस्था अस्ताव्यस्त करणे असे उद्योग अरब हाती घेतील. थोडक्यात, पिछाडीला गोंधळ माजवणे. सोबत तिथल्या स्थानिक भूगोलाची माहिती त्यांच्याकडे

अनुक्रमणिका

परिपूर्ण असल्याने तुर्कांच्या हालचाली, संभाव्य मार्ग, संख्या व उद्दिष्ट यांची माहिती ब्रिटिशांना सतत पुरवायची.या गोंधळ माजवण्यातून लहान तुर्क-ठाणी, तुकड्या एकट्या संपर्काविना सापडतील. त्यांचे काय करायचे ते अरबांवर सोडायचे. ही योजना पुरेशा तपशिलांसकट बेल यांनी तयार केली.

अशा गुरिला युद्धासाठी एक नेता हवा व तो अरब हवा. त्याच्या शब्दाला त्या जगात मोल हवे. बेल यांनी नेमके नाव पुढे केले. अमीर (म्हणजे टोळीप्रमुख) फैजल-इब्न-हुसेन. हा फैजल अरबांच्या सर्वांत मोठ्या 'हशमाइट' या टोळीचा प्रमुख होता. बेल यांच्या सोबत मागची अनेक वर्षे त्याचा संपर्क होता. खूप महत्त्वाची माहिती तो पुरवीत असे.

फैजल-इब्न-हुसेन याने हे नेतृत्व सहर्ष स्वीकारले. मात्र आधुनिक युरोपीय युद्धपद्धतीत जाणकार असा एक ब्रिटिश अधिकारी ब्रिटिश फौजा व फैजलचे अरब यांत दुवा म्हणून नेमावा व त्या अधिका-याला फैजलचा सैनिकी सल्लागार म्हणूनही जबाबदारी द्यावी, अशी गरज व्यक्त झाली. अरबस्तानची जाणकारी असलेली जी माणसे 'अरब ब्युरो' मध्ये काम करत होती, त्यांचा व्यक्तिगत तपशील तपासून गरट्रूड बेल यांनी सुयोग्य माणूस निवडला. ही निवड अचूक ठरली.

नाव होते मेजर टी. इ. लॉरेन्स. ही निवड करताना लॉरेन्स इतके भव्य यश मिळवेल, असा अंदाज बेल यांना आला असणे शक्य नाही. लॉरेन्स हे आर्किऑलॉजिस्ट (पुरातत्त्वज्ञ) होते. अरब ब्युरोत तेही त्यांच्या मध्यपूर्वेच्या काही ज्ञानामुळे घेतले गेले होते. त्यांना अरबी उत्तम येत असे. अरब प्रदेशांत गाढव-घोडा-उंट अशा प्राण्यांच्या पाठीवरून प्रवासाचा त्यांना अनुभव होता. ही सर्व मोहीम मेजर लॉरेन्स यांनी अरबांचा आदर व सहकार्य मिळवत इतक्या समर्थपणे हाताळली की, त्यांची ओळख 'लॉरेन्स ऑफ अरेबिया' अशी झाली. पहिल्या महायुद्धाच्या इतिहासात त्यांच्या नावाला व कार्याला एक महत्त्वाचे स्थान आहे.

मात्र एकदा ऑटोमन तुर्कांचा पराभव होत असताना त्यांच्या ताब्यातले मध्यपूर्वेतले प्रदेश स्वतंत्र झाल्यावर जी पावले ब्रिटन-फ्रान्सने उचलली, त्यामुळे मेजर लॉरेन्स व मुख्यतः गरट्रूड बेल यांना अतीव यातना झाल्या. एखाद्या वाढदिवस समारंभात आणलेल्या केकचे तुकडे जसे सुरीने कापण्यात येतात, तसे या मध्यपूर्वेचे स्वतःला सोयीस्कर तुकडे या विजयी सत्तेने करायला सुरुवात केली. महायुद्धानंतर लगेचच तिथे खनिज तेलाचा शोध लागला, ज्याची गरज ब्रिटन व युरोप यांच्या वाढत्या औद्योगिक साम्राज्यासाठी त्यांना वाटत होती.

असे कृत्रिम तुकडे स्थानिकांना गणतीत न घेता पाडणे हे अयोग्यच नव्हे तर दूरवर विचार करता आत्मघातक आहे, असे मत बेल सतत मांडत होत्या. त्यांचा मुद्दा साधा होता. या युद्धामुळे 'अरब राष्ट्रवाद' आता जागा झाला आहे. बाटलीत कोंडलेला धूर आता वातावरणात मिसळला आहे. त्याला पुन्हा बाटलीत बंदिस्त करणे शक्य नाही. ही राष्ट्रवादाची शक्ती आज ना उद्या मध्यपूर्वेला कवेत घेईल. त्यांच्या भूमीत नव्याने सापडत असलेले खनिज तेल आपण कवडीमोलाने बळकावले आहे. ऑटोमन तुर्कांच्या जोखडातून मुक्त होताना या संपूर्ण अरब प्रदेशाला आपण स्वयंनिर्णयाचा नैसर्गिक अधिकार द्यायला हवा. त्यांचे भविष्य त्यांनाच ठरवू द्या. चुकतील, धडपडतील-सावरतील. त्यांची आर्थिक लूट, त्यांच्या भूमीचे कृत्रिम तुकडे पाडणे हे कमी होते म्हणून काय की, आपण ज्यू व अरब यांना पॅलेस्टाईन भूमीबद्दल परस्परविरोधी आश्वासने दिली आहेत, जी पाळण्याचा आपला हेतू नाही.

या सर्व विघातक कृत्यांविरूद्ध भविष्यात अरब उठाव करतील. या उठावाचा रोख युरोपीय सत्ता यांचे विरोधी असेल, ज्यांनी स्वार्थासाठी तुकडे पाडत अरबांना स्वयंनिर्णय नाकारला. शक्य आहे याला वेळ लागेल. पण हे भविष्यात नक्की घडेल. तेव्हा हा खेळ आवरा, पाऊल मागे घ्या. हा एक प्रकारचा 'टाइम बॉंब' आहे. ज्या वेळी त्याचा स्फोट होईल, त्या वेळी परिणाम भयानक असतील. अरब स्वभाव, त्यांच्या परंपरा, मानसिकता व इतिहासाचे सखोल ज्ञान यांवर आधारून हा इशारा गरट्रूड बेल ब्रिटनमधल्या राज्यकर्त्यांना देण्यासाठी भेटू लागल्या. मेजर लॉरेन्स यांचेही मत बेल यांच्याप्रमाणेच होते.'

मात्र आता 'गरज सरो आणि वैद्य मरो' या अनादी-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनंत वस्तुस्थितीचा अनुभव बेल यांना वाढत्या प्रमाणात येऊ लागला. मध्यपूर्वेत युद्ध जिंकले, ऑटोमन तुर्क आता फक्त तुर्कस्तानापुरते. हे घडवण्यात या लोकविलक्षण स्त्रीचा मोठा सहभाग आहे, हे सर्व ठीकच आहे. आता मात्र या बाई फार कटकट करू लागल्या आहेत. त्यांच्या सल्ल्याची आता गरज काय, असा विचार करत ज्या वरिष्ठ वर्तुळात त्यांना सहज प्रवेश असे, तिथे त्यांना अवहेलना-दुर्लक्ष भेटच टाळणे असा अनुभव वाढत्या प्रमाणात येऊ लागला. हाच अनुभव लॉरेन्स यांनाही येत होता. आपण वाळीत पडलो, भविष्य काय हे आपल्याला जाणवते आहे, पण कुणी ऐकूनही घ्यायला तयार नाही यामुळे त्या हताश झाल्या. ज्या मध्यपूर्वेच्या वाळवंटी प्रदेशावर, त्या माणसांवर त्यांनी निरपेक्ष प्रेम केले, ज्यांच्या स्वातंत्र्यासाठी परिश्रम केले, त्यांची वाताहात होत असलेले, पाहणे असह्य होत १२ जुलै १९२६ रोजी त्यांनी निराश होत आत्महत्या केली.

आज आपण मध्यपूर्वेतला भडका, त्याचे युरोपवर होणारे परिणाम पाहतो–अनुभवतो आहोत.

गरट्रूड बेल या असामान्य द्रष्ट्या, व्यासंगी, चळवळ्या, माणुसकी सदैव जागी ठेवणा-या स्त्रीच्या स्मृतीला वंदन करणे इतकेच आपल्या हाती आता उरलंय का? पुन्हा यक्षप्रश्न.

✷✷✷

---


सर्वधर्म अध्ययन केंद्र

**बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार**

प. ल. वैद्य

(या विषयावरील एका मौलिक परंतु दुर्मीळ ग्रंथाचे पुनर्मुद्रण. किंमत रु. ५०.००)

**धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार**

दि. के. बेडेकर

आवृत्ती दुसरी; पृष्ठे ६४+८; किंमत रु. ३०.००

*संपर्कासाठी पत्ता* : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ,
३१५, गंगापुरी, वाई, जि. सातारा.







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रासंगिक :

# बिहारमधील निवडणुका

तारतम्य

बिहारमधील निवडणुकांच्या निकालाने चहूकडे जोरदार खळबळ माजून राहिली आहे. नीतीशकुमार व लालू यादव या जोडगोळीच्या प्रचंड विजयामुळे भाजपविरोधी पक्षांना मोठा हुरूप आला असून भाजपच्या केंद्रातील सत्तेलाही तडे जातील; अशी दारुण आशा त्यांना वाटू लागली आहे. लालू यादव यांनी तर जाहीरच करून टाकले की, "छोटे भाई नीतीशकुमार यांच्या हवाली बिहारचे राज्य करून मी स्वतः अखिल भारतीय पातळीवर भाजपला आव्हान देणारी आघाडी तयार करणार. याची सुरुवात पंतप्रधानांचा मतदार संघ बनारस येथे जाऊन व सभा घेऊन मी करणार." नीतीश कुमार यांच्या चेह-यावर किंचितसे मिष्किल स्मित कायमच विराजत असते, ते आता आणखी खुलून चमकू लागले आहे.

बिहारमधील महागठबंधनातील 'तोंडी लावणे' म्हणून असलेला काँग्रेस पक्ष याच्यावरचीही सुतकीकळा विरून गेली आहे. त्या पक्षाने कधी नव्हेत इतक्या, एकेचाळीस पैकी सत्तावीस जागा जिंकल्या आहेत. गेल्या पस्तीस वर्षांत काँग्रेसला बिहारात इतक्या जागा मिळाल्या नव्हत्या. त्यातून गेल्या पंधरा वर्षांत तर बिहारमधील निवडणुका लढवणे हा काँग्रेसच्या लेखी केवळ एक औपचारिकतेचा भाग झाला होता. या खेपेला काँग्रेसने लालूजी व नीतीशजी यांच्याशी हात-मिळवणी केली. व एकेचाळीस जागांवर निवडणुका लढविण्याची परवानगी मिळविली. तीही अशी अलिखित अट घालून की, आमचे थोर नेते सोनियाबाई आणि राहूलजी जेव्हा भाषण करतील तेव्हा तेथे लालूजी व नीतीशजींनी हजर राहू नये. या तीनही पक्षात भाजपबद्दलचे वैर इतक्या पातळीवर पोचले होते की, या अटीसकटही एकत्र निवडणुका लढविण्यास तिन्ही पक्ष तयार झाले.

इकडे भाजपनेही बिहारमधील निवडणुकीच्या लढाईसाठी जंगी तयारी केली होती व त्या तयारीचा दबदबा निर्माण करणारी वार्ताचित्रे दूरदर्शनवर दाखविण्यात येत होती. या पक्षाने एकशेसाठ सुसज्ज रथ तयार ठेवले होते. निवडणुक प्रचाराच्या तीन महिन्यांच्या काळात हे रथ बिहारमधील प्रत्येक मतदार-संघात फिरून भाजपचे निवडणुकीतील महत्त्वाचे सूत्र "सबका साथ, सबका विकास" याचा सततचा घोष मतदारांच्या कानावर घालणार होते. निवडणुकीची आचारसंहिता लागू होण्याच्या आधी पंतप्रधान मोदी यांनी एक लाख पंचवीस हजार कोटी (यात किती शून्ये असतात हो?) रुपयांचा घसघशीत देकार बिहारच्या विकासासाठी जाहीर केला होता! निवडणुका जाहीर होऊन सुमारे महिना-सव्वा महिना प्रचारासाठी मिळाल्यावर आपल्या प्रचारात कोणतीही कसूर राहू नये याची जास्तीत जास्त काळजी भाजपचे धुरंधर अध्यक्ष अमित शहा यांनी घेतली होती. केंद्रीय मंत्रिमंडळातील सर्व बिहारी मंत्री आपापल्या मतदारसंघात राहून निवडणुकीची मोर्चेबांधणी करीत होते. भाजपचे बिहारातून निवडून आलेले सर्व खासदारही मतदारसंघाच्या प्रत्येक विभागातील लोकसंपर्कावर लक्ष ठेवून होते. स्वतः पंतप्रधान मोदींनी ३१ वेळा बिहारात जाऊन ठिकठिकाणी त्यांच्या नेहमीच्या शैलीत, श्रोत्यांशी प्रश्नोत्तरे करून त्यांना आपल्या वक्तृत्त्वाच्या ओघात सामावून घेत आक्रमक आणि आवेशपूर्ण भाषणे केली. अमित शहांनी मोदींचा कित्ता गिरवीत अगणित भाषणे ठोकली. असे वाटत होते की, अशा ह्या चतुरंग प्रचारासमोर महागठबंधनाचा पाचोळा होऊन जाईल.

परंतु, निवडणुकीचे निकाल अगदीच अनपेक्षित लागले. पहिल्या दोन टप्प्यातले मतदान झाल्यावरच काही चाणाक्ष निरीक्षक असे सांगू लागले होते की, या दोन टप्प्यात भाजप अनेक ठिकाणी महागठबंधनाच्या मागे पडला आहे. पण अशी आशा भाजप समर्थकांना वाटत होती की, पुढच्या तीन टप्प्यात मोदी-शहा बाजी

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मारुन जातील. निवडणुकीचे सर्व टप्पे आटोपल्यावर मतदार-पाहणीचे निष्कर्ष सांगण्यास सुरुवात झाली. एक सर्वेक्षण वगळता बाकी सर्व पाहण्यांचा अंदाज होता की भाजप व महागठबंधन यांच्यात निकराची चढाओढ आहे; आणि कोणीही विजयी झाले तरी त्या विजेत्याची आघाडी अगदीच निसटती असेल. पण या सगळया अंदाजांना उलथवून टाकत मतदारांनी महागठबंधनाच्या दोनशे त्रेचाळीसपैकी एकशे अठ्याहत्तर मतदारसंघात दणदणीत विजय मिळवून दिला.

(१)

ज्याप्रमाणे मराठीत कोणतीही कादंबरी प्रसिद्ध झाली की, 'मराठी साहित्याला नवे वळण' मिळाल्याचा डांगोरा पिटला जातो त्याप्रमाणे कोणतीही निवडणुक झाली की, 'राजकारणाला नवी दिशा' मिळाल्याचे नगारे वाजू लागतात. १९६७ साली बंगालमध्ये अजॉय मुखर्जी या कॉंग्रेसच्या एका बुजुर्ग नेत्याने कॉंग्रेसमधून फुटून 'बांगला कॉंग्रेस' नावाचा पक्ष काढला. निवडणुका होऊन कॉंग्रेसचे पश्चिम बंगाल मधील बहुमत संपले; तरी विधानसभेतील तो सर्वात मोठा पक्ष होता. बाकीचे सर्व पक्ष- म्हणजे मुख्यतः डावे कम्युनिस्ट, उजवे कम्युनिस्ट व फॉरवर्ड ब्लॉक अजॉय मुखर्जींच्या नेतृत्वाखाली एक झाले. त्यांनी मंत्रिमंडळ तयार करण्याचा दावा मांडला.कलकत्याच्या 'मैदाना' वर प्रचंड सभा झाली. त्यांनी बातमी देऊन शेवटी 'टाईम्स' ने ('टाईम्स ऑफ इंडिया') म्हटले होते. 'सभेतून परतणा-या प्रत्येक मनुष्याला वाटत होते की, नवयुगाचा प्रारंभ झाला आहे.' (त्यानंतर काही महिल्यातच डाव्या पक्षांनी अजॉय मुखर्जी यांना 'सळो की पळो' करून सोडले. तेव्हा टाईम्सने मथळा दिला होता 'नो जॉय फॉर अजॉय.') आताही नीतीश-लालू यांच्या विजयानंतर आशाळभूतांना दिल्लीतील भाजप-सरकार उखडले जाईल, अशी स्वप्ने पडू लागली आहेत. परंतु, मोदींनी मिळवून दिलेल्या विजयानंतर राज्याराज्यातून आपली सरकारे येतील अशी मनोराज्ये भाजपने करावीत, हे जसे चुकीचे होते त्याचप्रमाणे प्रादेशिक पक्षांची मोट बांधून केंद्रीय सत्ता हाती घेण्याची आशा लालू-नीतीश यांनी बाळगणे हे चुकीचे होईल.

ही गोष्ट खरीच आहे की, आधी दिल्लीत व नंतर बिहारमध्ये भाजपला मोठी ठोकर बसली आहे. पण त्याचे कारण भाजप व मोदी आणि शहा यांच्या विषयी जनतेचा भ्रमनिरास झाला आहे, हे नसून या दोन्ही ठिकाणी प्रादेशिक अस्मिता उफाळून आल्या आहेत, हे आहे. दिल्लीसारख्या महानगरात, जिथे देशाच्या निरनिराळ्या भागातून आलेली माणसे राहतात, प्रादेशिक भावना जागृत झाल्या, हे म्हणणे सकृद्दर्शनी पटण्याजोगे नाही. पण दिल्ली हे नोकरीत असणा-या व सरकारी नोकरीतून निवृत्त झालेल्या बाबू व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांचे शहर आहे. गेल्या चाळीस वर्षांत तेथे प्रादेशिक पक्ष उदयाला आला नाही. ब-याच कालपर्यंत जनसंघ-भाजप हाच पक्ष तेथील प्रादेशिक पक्ष होता व त्यामुळेच देशात इतरत्र कोठेही जनसंघ-भाजपचे राज्य नसले तरी दिल्ली महानगरपालिका व दिल्ली विधानसभा इथे जनसंघ-भाजप बहुमत मिळवीत असे. परंतु १३ साली 'आय' हा पक्ष निर्माण झाला. त्या पक्षाचे एकमेव नेते केजरीवाल हे निवृत्त बाजू आहेत. त्यांच्या भोवती गोळा झालेली माणसेही दिल्लीतील बाजू -मंडळीच आहेत. मागच्या निवडणुकीत दिल्लीतील लढत ही, अनेक दृष्टींनी, स्थानिक भाजप आणि प्रादेशिक 'आय' पक्ष यांच्यात झाली. त्या निवडणुकीत भाजपचे बहुमत जरी नाही तरी सर्वाधिक जागा विधानसभेत मिळवल्या आणि कॉंग्रेस हा पक्ष कोप-यात टाकला गेला. १५ सालच्या निवडणुकात भाजप हा मोदी-शहा यांच्या नेतृत्वाखालील अखिल भारतीय पक्ष म्हणून निवडणुकीत उतरला. दिल्लीवासियांना त्यात आपला चेहरा कोठेच दिसेना त्यामुळे 'आय' ला प्रचंड विजय मिळाला.

गेल्या पन्नास वर्षांचा इतिहास पाहिला तर असे दिसून येते की, निरनिराळ्या राज्यातील निवडणुका अखिल भारतीय पक्षांची लोकप्रियता -हास पावत असून प्रादेशिक पक्षच राज्यात अधिकारावर आले आहेत. १९६७ साली तामिळनाडूतील कॉंग्रेस पक्षाची सत्ता गेली. तेव्हापासून आतापर्यंत कॉंग्रेसला पुनःतेथे बहुमत मिळवता आले नाही. भाजपला त्या राज्यात काहीच स्थान नाही. १९७७ साली बंगालमध्ये डाव्या कम्युनिस्टांच्या आघाडीचे सरकार स्थापन झाले. डावे कम्युनिस्ट हे स्वतःला अखिल भारतीय स्तरावरचा पक्ष म्हणवून घेत असले तरी वस्तुतः




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तो बंगाल मधील प्रादेशिक पक्षच होता. पाच वर्षांपूर्वी डाव्या कम्युनिस्टांच्या राजवटीचा पाडाव झाला; पण राज्यावर आलेला तृणमूल काँगेस हा पक्ष देखील प्रादेशिक पक्षच होता. ओरिसातील बीजू जनता दलाला तेथून हलवणे कॉग्रेसला शक्य झाले नाही व भाजपने तर तसा प्रयत्नही केला नाही. मुद्दा असा की, जिथे जिथे प्रादेशिक पक्षांची सरकारे आली, तिथे तिथे अखिल भारतीय स्तरांवरील पक्षांना आपले स्थान निर्माण करता आलेले नाही. प्रादेशिक पक्षांशी हातमिळवणी करूनच त्यांना राज्यातील सरकारात वाटेकरी होता आले आहे.

बिहारमध्ये गेली पस्तीस वर्षे लालूजींचे राष्ट्रीय जनता दल (राजद) किंवा लालूजींशी भांडण करून संयुक्त जनतादला (संजद) ची निराळी चूल मांडलेले नीतीशजी यांची राजवट राहिली आहे. या दोन पक्षांतील वैरामुळे लालूजींचा पदर धरून काँग्रेस व नीतीशजींच्या आधाराने भाजप यांनी राज्यातील राजकारणात तग धरला. २०१४ साली झालेल्या लोकसभेच्या निवडणुकीत नीतीशजींनी भाजपची संगत सोडली, पण लालूजींशी मैत्री केली नाही. दोघांनीही स्वतंत्रपणे निवडणुका लढवल्या. त्या राष्ट्रीय पातळीवरील निवडणुका असल्याने प्रादेशिक अस्मितेला आवाहन करण्याचा उपयोग नव्हता. परिणामी या दोन्ही दलांचा सपाटून पराभव झाला. त्यानंतर विधानसभेच्या निवडणुका दीड वर्षांवरच आल्या होत्या.

या कालावधीचा उपयोग या दोन्ही दलांनी आपसातील भांडणे मिटवण्यासाठी केला. सुरुवातीला तर त्यांनी आपली दले व उत्तरप्रदेशातील (उप्र) समाजवादी पक्ष यांचे एकत्रीकरण करून व्ही. पी. सिंग यांच्या काळातील जनतादल पुनरूज्जीवित करण्याचा प्रयत्न केला. तसे झाले असते तर बिहारी दलांचा व उप्रतीय समाजवादी पक्षाला आपापल्या प्रादेशिक अहंकारांना मुरड घालावी लागली असती व ते फायद्याचे झाले नसते.

यासाठी जनता दलाचा नवा अवतार बाटलीत बंद करून 'महागठबंधन' तयार करण्यात आले. हे दोन प्रादेशिक पक्ष एकत्र आले तेव्हाच भाजपसारख्या राष्ट्रीय पक्षाला या निवडणुकात फारसे यश मिळणार नाही, हे स्पष्ट झाले होते. बिहारची निवडणूक ही दिल्लीतील निवडणुकीची विस्तारित आवृत्ती होती.

निवडणुकांच्या प्रचारात इतर अनेक मुद्दे मांडले गेले व त्यांचा परिणाम भाजपचा पराभव होण्यात झाला असे काही निरीक्षकांना वाटते. सरसंघचालक मोहनराव भागवत यांनी 'पांचजन्य' या संघाच्या मुखपत्राला दिलेल्या मुलाखतीत 'आरक्षणाच्या धोरणाचा पुर्नविचार झाला पाहिजे,' असे मत मांडले. भाजप हा संघाच्या नियंत्रणाखालील पक्ष असल्यामुळे भाजप 'आरक्षण' उठवणार असा गहजब नीतीश व लालू यांनी केला. त्यामुळे भाजपचा पराभव झाला, असे काही जाणकारांना वाटते. तर काही कौटिल्यांचे असेही मत आहे की, संघाला मोदी-शहा यांना हादरा द्यायचा असल्यामुळे संघाने मुद्दामच 'आरक्षणा'चा विषय मोक्याच्या वेळी काढला. 'गोमांसा' चा विषयही असाच माजवण्यात आला. पण या मुद्यांना फारसे महत्त्व नाही.'सबका लाभ, सबका विकास' या मोदींच्या घोषणेला तोंड देण्यासाठी महागठबंधनाने बिहारी अस्मितेची चूल पेटविली होती. त्यातूनच 'बिहारचा डिएनए', 'बिहारी विरुद्ध बाहरी' असे बिहारी जनतेला भिडणारे मुद्दे नीतीश व लालू यांनी रिंगणात फिरते ठेवले.

मला तर वाटते की, निवडणुकातील प्रचार हे आता केवळ कर्मकांड झालेले आहे. निवडणुका होणार असे कळताच बहुतेक मतदारांनी आपण कोणाला मत द्यायचे हे ठरवून ठेवलेले असते. प्रचार-सभा, पत्रके वृत्तपत्रातील बातम्या किंवा चित्रवाणीवरील गोंधळघालू वादविवाद यांच्यामुळे कोणी मतदार आपले ठरवलेले मत बदलेल अशी शक्यता अगदीच नगण्य असते. २०१४ च्या लोकसभा-निवडणुकात मोदींनी प्रचाराची वावटळ उठवली. त्यांच्या सभांना लोकांची गर्दी होतीच पण ते लोक भाषणाला उत्साही प्रतिसादही देत होते. याचे कारण,'आपल्याला जे ऐकायचे आहे तेच मोदी बोलतील' अशी खूणगाठ बांधूनच लोक सभांना येत होते. म्हणजे मोदींना मत देण्याचा निर्णय घेऊनच ते सभेला येत होते. तीच गोष्ट बिहारात झाली. महागठबंधन बांधले गेले तेव्हाच मतदारांनी आपले निर्णय घेऊन टाकले.

आपल्या पराभवाची मीमांसा करताना भाजपने म्हटले आहे की, गठबंधनातील घटकपक्षांची मते परस्परांकडे निरपवादपणे वर्ग होतील, याचा अंदाज आम्हाला आला



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नाही. म्हणजे असे की, एका मतदार संघात राजदचा उमेदवार आहे व त्या मतदारसंघात संजदमध्ये लाख मतदार आहेत. तर संजदची सर्व एक लाख मते राजदच्या उमेदवाराला पडतातच असे लाही. त्यातली वीस-पंचवीस हजार मते भाजपला मिळू शकतात. तसे या खेपेला झाले नाही. याचे कारण हेच की संजदचे मतदार हे संजदचे राहिले नव्हते, तर 'महागठबंधना' चे मतदार झाले होते. भाजप विरुद्ध बिहारी असे चित्र उभे करण्यात नीतीश व लालू यशस्वी झाले होते.

***

प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमाला, वाई

**हिंदुधर्माची समीक्षा** (चौथी आवृत्ती)

आणि

**सर्वधर्मसमीक्षा** (दुसरी आवृत्ती)

**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी**

पृष्ठे : २९५ किंमत रु. २२५/-

संपर्क : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ,

३१५, गंगापुरी, वाई, जि. सातारा.

अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

**महाभारत–काल–गणनेतील षडयंत्र.**

**लेखक : हरगोविंद म. होले**

भारताच्या इतिहासाच्या कालगणनेतील घोटाळ्यावर प्रकाश टाकणारा ग्रंथ.

दोन अभिप्राय.

(१)

प्राचीन भारतीय कालगणनेत मूलभूत संशोधन करून आपण विल्यम जोन्स सारख्या विद्वानांची मते उलथून टाकली आहेत. 'अशोकस्' म्हणवणा-या दुस-या चंद्रगुप्तास जोन्सने 'अशोक' ठरवले हे आपल्या ग्रंथावरून स्पष्ट होते.

आपल्या ग्रंथावर विद्यापीठीय स्तरावरील विद्वानांकडून खल झाला पाहिजे. एक प्रकारे आपण भारताच्या इतिहासाचे पुनर्लेखन केले आहे.

जयसिंगराव पवार.

संचालक : महाराष्ट्र इतिहास प्रबोधिनी, कोल्हापूर.

(२)

एका ऐतिहासिक सत्याचा अभ्यासकाने घेतलेला खळबळजनक मागोवा. 'महाभारत–काल–गणनेतील षडयंत्र' या ग्रंथात इंग्रज इतिहासकार विल्यम जोन्स याने शिशुनागवंशाला इ. स. पू. ६४२ या वर्षांत स्वतःच्या कल्पनेने दाखवून युधिष्ठिराच्या राज्यारोहणाचा काळच कसा जाणीवपूर्वक नष्ट केला हे लेखकाने प्राचीन ग्रंथाच्या व निरनिराळ्या संवतांच्या आधाराने व शिलालेखातील उता-यांच्या सहाय्याने सिद्ध केले आहे.

मोहन वसंत वैद्य.

संपादक : प्रकाशन विश्व. पुणे.

**पृष्ठे ४९८. सवलतीची किंमत रु. २५०/- टपालखर्च वेगळा.**

**पुस्तकासाठी ९५६१७२९३९९ या चलध्वनिक्रमांकावर संपर्क साधावा.**




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## लेखकांचा परिचय


❖ **प्रा. श्री. मा. भावे**

माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच. डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध.

***पत्ता :–*** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११००४.

दूरध्वनी :– (०२०) २५६७४०९३.

❖ **प्रा. डॉ. चंद्रशेखर बर्वे.**

स. प. महाविद्यालयात मराठीचे विभाग प्रमुख व प्राध्यापक (आता निवृत्त) ‘तेंडुलकरांची नाटक’ या विषयावर प्रबंध लेखन.

***पत्ता :–*** बी. ४/३, पी. डब्ल्यू. डी. सोसायटी, रामबाग कॉलनी, नवी सदाशिव पेठ, पुणे - ४११ ०३०.

❖ **डॉ. कमलेश सोमण,**

लेखक, समीक्षक आणि अनुवादकार.

***पत्ता :*** आनंदविहार, सी-२/३, लायगुडे मळा, गणेशनगर, धायरी, पुणे-४११ ०४१

भ्रमणध्वनी : ९४२२३५०३५०..

❖ **विश्वास दांडेकर**

निवृत्त उच्चपदस्थ अधिकारी, आयुर्विमा महामंडळ; इतिहास, युद्धे व युद्धशास्त्र या विषयांमध्ये विशेष रुची व अभ्यास; वृत्तपत्रे व नियतकालिके यांमधून प्रासंगिक लेखन.

***पत्ता :–*** ‘मालवती’ १७ ब, कांगा कॉलनी, सदरबाजार, सातारा–४१५००१.

दूरध्वनी :– (०२१६२) २३५२५४.


अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

# लेखकांस आवाहन

नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारताकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.

४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

– संपादक मंडळ

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई